








नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

वर्ष ३१ ] एप्रिल १९७८ [ अंक ७

---

**जॉन पासमोर**
निसर्गाविषयीच्या वृत्ती
अनु० मे. पुं. रेगे

**अ. भि. शाह**
पंडिता रमाबाई
अनु० मीरा भागवत

ग्रंथ-परिचय : **विश्वास कानडे**
'अ सेप्रिट रिॲलिटी'
कार्लोस कास्टानेडा

**तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी**
आमची अमेरिकेची यात्रा
( शेवटचा भाग )

**प्र. रा. दामले**
गांधीजी, हिंदुधर्म व बुद्धिवाद

---

**वार्षिक वर्गणी १८ रु.** **अंकास २ रु.**

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे
संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्राज्ञपाठशाळामंडळ वाई, संचालित मासिक
( महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ पुरस्कृत )

# नवभारत

वर्ष एकतिसावे : अंक सातवा
एप्रिल १९७८

अध्यक्ष व विश्वस्त
**तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी**



**संपादक-मंडळ**
मे. पुं. रेगे ( का. सं. ),
वसंत स. जोशी, रा. ग. जाधव, अ. ना. ठाकूर,
सु. र. देशपांडे, अ. र. कुलकर्णी, रंगनाथशास्त्री जोशी,
रा. पु. कोल्हटकर, भा. ग. सुर्वे ( निमंत्रक ).

**पत्रव्यवहार :**
**संपादकीय** : भा. ग. सुर्वे
प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई–४१२८०३
**व्यवस्थापकीय** : पां. गो. आपटे,
व्यवस्थापक ‘ नवभारत ’ मासिक
द्वारा : प्राज्ञ प्रेस, वाई ( जि. सातारा )

**वार्षिक वर्गणी १८ रु. किरकोळ अंकास रु. २**

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे
संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# लेखक-परिचय

**तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी :**

विद्वान, विचारवंत, लेखक व विश्वकोशाचे प्रमुख संपादक.

**प्र. रा. दामले :**

तत्त्वज्ञानाचे सेवानिवृत्त प्राध्यापक (नौरोसजी वाडिया कॉलेज, पुणे व पुणे विद्यापीठ) व 'तात्त्विक चर्चा,' 'तत्त्वज्ञान विषयक निबंध', 'फिलॉसॉफिकल एसेज' इ. ग्रंथांचे लेखक, पुणे.

**जॉन पासमोर :**

ऑस्ट्रेलियन नॅशनल युनिव्हर्सिटी, कॅनबरा येथे तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक व 'राल्फ कुडवर्थ' (१९५१), 'ह्यूम्स इन्टेन्शन्स' (१९५२), 'अ हंड्रेड इअर्स ऑफ फिलॉसॉफी' (१९६०), 'फिलॉसॉफिकल रीझनिंग' (१९६१) इ. ग्रंथांचे लेखक.

**विश्वास कानडे :**

नागपूर विद्यापीठाच्या स्नातकोत्तर इंग्रजी विभागात प्राध्यापक; इंग्रजी, सौंदर्यशास्त्र व भाषाशास्त्राचे अध्यापक; इंग्रजी व मराठी नियतकालिकांतून कथा, कविता.

**अ. भि. शाह :**

विचारवंत, लेखक व 'न्यू क्वेस्ट'चे संपादक, पुणे.

**रा. ग. जाधव :**

मराठी समीक्षक, मराठीचे माजी प्राध्यापक व मराठी विश्वकोशाच्या मानव्य विद्या कक्षेचे प्रभारी विभाग संपादक, वाई.

**पंडित टापरे :**

मराठीचे प्राध्यापक, मानव्य व वाणिज्य महाविद्यालय, वाई.

**प्रतिभा पोरे :**

मराठी विश्वकोशाच्या एक संपादिका, वाई.

**एस्. डी. इनामदार :**

मराठी विश्वकोशाचे एक संपादक, वाई.

**वसंत स. जोशी :**

मराठीचे प्राध्यापक व विभाग प्रमुख, मानव्य व वाणिज्य महाविद्यालय, वाई.

**व्यं. वा. कोटबागे :**

हिंदीचे प्राध्यापक व विभाग प्रमुख, मानव्य व वाणिज्य महाविद्यालय, वाई.

---

## चुकांची दुरुस्ती

'नवभारत' मार्च ७८ च्या अंकात पुढील चुका राहून गेल्यात. त्याबद्दल दिलगीर आहे– निमंत्रक.

१) पृ. ४४ वरील दुसऱ्या तळटिपेच्या तिसऱ्या ओळीतील शेवटला शब्द 'my' ऐवजी 'any' वाचावा.

२) पृ. ४५ स्तंभ २ मधील १७ व्या व १८ व्या ओळीतील 'घोडतोंडचा' 'माकडतोंडचा' हे शब्द अनुक्रमे 'घोडतोंड्या', 'माकडतोंड्या' वाचावेत.

३) पृ. ६० वरील 'साभार पोच' ह्यातील क्रमांक तीनच्या ग्रंथाचे नाव 'उत्तम कथा' ऐवजी 'सर्वोत्कृष्ट मराठी कथा: खंड १० वा' असे वाचावे.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# संपादकीय .... ....

## विद्यापीठे आणि मराठी

उच्च शिक्षणाचे माध्यम म्हणून मराठीचा महाराष्ट्रातील विद्यापीठात प्रवेश होऊन पंचवीस वर्षे लोटून गेली आहेत. तरीही समृद्ध आणि कार्यक्षम ज्ञानभाषा–आधुनिक ज्ञानाची वाहक असलेली ज्ञानभाषा– हे स्वरूप आणि दर्जा मराठीने प्राप्त करून घेतलेला नाही. एकतर भौतिक विज्ञाने आणि तंत्रज्ञान यांच्या शिक्षणाचे माध्यम म्हणून मराठीचा वापर करण्यात येत नाहीच. मानव्यविद्या, वाणिज्य, इ. ज्या शाखांतून मराठीचा बऱ्याच प्रमाणात वापर होत असतो त्यांच्यातही पदव्युत्तर अध्यापनाचे आणि अध्ययनाचे माध्यम म्हणून इंग्रजीचाच सर्वसाधारणपणे आश्रय करण्यात येतो. परीक्षेत मराठीतून उत्तरे लिहिण्याची सवलत एवढाच मराठी माध्यमांचा अर्थ असतो. प्रारंभापासून आकांक्षा बाळगणाऱ्या विद्यार्थ्यांना जर इंग्रजी भाषा चांगली अवगत असेल तर सुरवातीपासूनच इंग्रजीतून अभ्यास करणे ते पसंत करतात. विद्यापीठातून मराठीला हे जे गौण, असुरक्षित स्थान आहे त्याचे प्रमुख कारण वेगवेगळ्या विषयावर मराठीत पुरेसे दर्जेदार साहित्य उपलब्ध नाही हे आहे असे सांगण्यात येते. आणि ह्या आरोपात खूपच तथ्य आहे हे नाकबूल करण्यात हंशील नाही.

वेगवेगळ्या विषयांचे चोख, पद्धतशीर विवेचन करणारी कसदार पाठ्यपुस्तके आणि इतर प्रमाण ग्रंथ मराठीत नाहीत म्हणून मराठीला माध्यम म्हणून मान्यता मिळू शकत नाही आणि मराठीला माध्यम म्हणून मान्यता नाही म्हणून मराठीत पाठ्यपुस्तके आणि इतर प्रकारचे पूरक ग्रंथ निर्माण होत नाहीत ह्या दुष्टचक्राचा भेद मराठीला माध्यम म्हणून मान्यता देऊनच करता येईल अशी एक समजूत होती. आणि आपण ह्या दुष्टचक्राचा भेद असा केलाही. पण अपेक्षेप्रमाणे पुरेशी कसदार पाठ्यपुस्तके मराठीत निर्माण झाली नाहीत. अमाप पाठ्यपुस्तके प्रकाशित झाली पण त्यांचे स्वरूप सर्वसाधारणपणे अतिशय तकलुपी, परीक्षार्थी विद्यार्थ्यांची झटपट सोय करून देणाऱ्या 'मार्गदर्शिका' असेच राहिले. ज्येष्ठ, व्यासंगी प्राध्यापकांनी पाठ्यपुस्तके लिहिण्याचे कष्ट घेण्याचे टाळले, आपल्या व्यावसायिक कर्तव्याचा हा भाग त्यांनी पार पाडला नाही आणि त्यामुळे निर्माण झालेली पोकळी पोटभरू प्रवृत्तीच्या प्राध्यापकांनी आपल्या अर्ध्याकच्च्या लिखाणाने भरून काढली, निष्पाप विद्यार्थी ह्या परिस्थितीचे बळी ठरले असेही म्हणता येत नाही. उदा. कित्येक ज्येष्ठ, प्रदीर्घ व्यासंगात नसले तरी प्रदीर्घ सेवेत आयुष्य घालविलेल्या नामवंत प्राध्यापकांनी सेवानिवृत्तीनंतर किंवा त्या सुमारास तर्कशास्त्रावर जी पाठ्यपुस्तके लिहिली आहेत ती पाहिली तर चांगल्या पाठ्यपुस्तकांचा मराठीत जो अभाव आहे त्याचे कारण सर्वसामान्य प्राध्यापकांची लिहिण्याविषयीची अनिच्छा हे नसून कसदार लेखन करण्याची असमर्थता हे आहे ही गोष्ट उघड होते.

मग प्रश्न उपस्थित होतो तो हा : मराठीचा महाविद्यालयांतून माध्यम म्हणून उपयोग व्हायला सुरवात होण्यापूर्वी हीच मंडळी इंग्रजीतून शिकवीत असत, आणि परीक्षा घेत असत. त्यांनी लावलेल्या कसोट्यांचे समाधान करण्यासाठी कोणत्या दर्जाच्या इंग्रजी पाठ्यपुस्तकांचा अभ्यास करणे विद्यार्थ्यांच्या दृष्टीने पुरेसे असे ? इंग्रजी हे अध्यापनाचे आणि परीक्षेचे सक्तीचे माध्यम असताना प्रत्यक्षात विद्यार्थी



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

कोणती पाठ्यपुस्तके वाचीत ? विद्यापीठाशी संबंधित असलेल्या सर्वांना ह्या प्रश्नाचे उत्तर माहीत होते. विषय 'सोपा' करून सांगणारी, म्हणजे त्याच्यातील बुद्धीला आव्हान देणारा, वळण लावणारा, तिचे पोषण करणारा आशय 'पातळ' करणारी, ठरीव ठशाच्या प्रश्नांची ठरीव उत्तरे पुरविणारी पाठ्यपुस्तकेच बहुसंख्य विद्यार्थी वाचीत. ह्या सर्वपरिचित वस्तुस्थितीमुळे, ह्या विषयांवर पुरेसे प्रमाण, कसदार साहित्य मराठीत उपलब्ध नाही हे कारण देऊन मराठीचा माध्यम म्हणून विद्यापीठात प्रवेश होण्याला जे विरोध करीत ते केवळ एक सबब पुढे करीत आहेत असा अनेकांचा स्वाभाविकपणे ग्रह होत असे, कारण इंग्रजीतील प्रमाण, कसदार साहित्य बहुसंख्य विद्यार्थ्यांच्या आवाक्याबाहेर होते आणि ह्या साहित्याचे फारतर अतिशय क्षीण असे प्रतिबिंबच प्राध्यापकांच्या शिकविण्यातून उमटत असे, आणि इंग्रजी भाषेवर पुरेशी हुकमत नसल्यामुळे हे इंग्रजी साहित्य विद्यार्थ्यांच्या आकलना-पलीकडचे ठरत असे असे नाही. विद्यार्थ्यांची विषयाविषयीची जिज्ञासा जागृत झालेली नसे, प्रगल्भ विषय आत्मसात् करण्यासाठी जी बौद्धिक ताकद लागते ती महाविद्यालयांत प्रवेश करीपर्यंत त्यांनी कमावलेली नसे, अशी ताकद कमवायला उत्तेजन मिळेल, साहाय्य होईल असे महाविद्यालयातील शिक्षण नसे हे विद्यार्थ्यांच्या ह्या असमर्थतेचे कारण असे. बहुसंख्य विद्यार्थी ज्या प्रकारची इंग्रजी पुस्तके प्रत्यक्षात वाचीत ती डोळ्यासमोर ठेवून मराठीतील पाठ्यपुस्तके बनविण्यात आली आणि अधिक कसदार पुस्तके प्रकाशित झाली असती तर तीही समान पातळीवरील इंग्रजी पुस्तकांप्रमाणेच सर्वसामान्य विद्यार्थ्यांच्या दृष्टीने निरुपयोगी ठरली असती. मराठीतून कसदार पाठ्यपुस्तकांचा पुरवठा होत नाही ह्याचे कारण अशा पुस्तकांसाठी मागणी नाही कारण ज्या प्रकारच्या कसदार शिक्षणातून ही मागणी स्वाभाविकपणे उद्‌भवते तशा शिक्षणाचा पुरवठा होत नाही. पुरवठ्यातून आपोआप मागणी निर्माण होते हा नियम येथे लागू पडतो.

ही दु:स्थिती केवळ पाठ्यपुस्तके आणि खास विद्यापीठीय अध्ययनासाठी आवश्यक ग्रंथ यांच्या-पुरती मर्यादित नाही. उदा. आर्ट्‌स शाखेकडे अर्थशास्त्र हा सर्वात प्रतिष्ठित आणि लोकप्रिय असा विषय आहे. पदवी परीक्षेसाठी आणि पदव्युत्तर परीक्षेसाठी अर्थशास्त्राचा विशेष अभ्यास केलेले हजारो विद्यार्थी आज महाराष्ट्रात वावरत आहेत. आज देशापुढे अतिशय गंभीर आर्थिक समस्या आहेत आणि योग्य आर्थिक धोरणे आखून त्यांच्यांवर आधारलेले कार्यक्रम तडीला नेणे हा बहुसंख्य भारतीयांच्या जीवनमरणाचा प्रश्न बनला आहे. ह्या परिस्थितीत आपली अपेक्षा अशी राहील की दैनिकातून, साप्ताहिक पुरवण्यांतून, मासिकांतून ह्या क्षेत्रातील तज्ज्ञ ह्या समस्यांची, त्यांच्यावरील तोडग्यांची चिकित्सा करीत राहतील, अर्थशास्त्राच्या पदवीधरांत ह्या लिखाणाविषयी अतिशय औत्सुक्य असेल, शाळा–कॉलेजातील अध्यापकांच्या खोल्यांत, बस–स्टॉपवर ह्या लिखाणांतून उद्‌भव-लेले अटीतटीचे वाद रंगतील. पण असे घडताना दिसत नाही. सर्वत्र सामसूम आहे. अर्थशास्त्राच्या महाराष्ट्रीय पदवीधरांची, मराठीतून अर्थशास्त्र शिकलेल्या पदवीधरांची संख्या बरीच मोठी आहे खरी. पण अर्थशास्त्राविषयीच्या त्यांच्या ज्ञानाचे, जिज्ञासेचे प्रतिबिंब मराठीत उमटतच नाही; त्यांच्या मतांत, विचारांत, कृतीतही ते उमटत नाही. आपल्यापुढे असलेल्या समस्यां-विषयी समाजात चालणाऱ्या विचाराला प्रगल्भ, सूक्ष्म, सुव्यवस्थित स्वरूप देणे, त्याला चोख ज्ञानाचे अधिष्ठान देणे, बौद्धिक शिस्त लावणे हे जर उच्चशिक्षित वर्गाचे एक काम असेल तर महाराष्ट्रातील ह्या वर्गाकडून ते पार पाडले जात नाही असेच म्हणावे लागते. आर्थिक समस्यांविषयी माहितीपूर्ण, वेगवेगळ्या सैद्धान्तिक भूमिकांचे खंडनमंडन करणारे जे वादविवाद भारतात होतात ते इंग्रजीतूनच होतात. तत्त्वज्ञान, समाजशास्त्र, पुरातत्त्वविद्या, इ. गंभीर विषयांवर मराठीतून अधूनमधून पुस्तके प्रकाशित होतात, लेख लिहिले जातात आणि त्यांचे संग्रह प्रसिद्ध करण्यात येतात ह्यात शंका नाही. तसे होत नसते तर 'ललित' मासिकाला दरवर्षी वैचारिक साहित्याचा आढावा घेता आला नसता. पण हे सर्व काही व्यक्तींची खाजगी हौस म्हणूनच घडते. मराठीतून ह्या विषयांवरही लेखन

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

झाले पाहिजे, हा मराठीच्या प्रतिष्ठेचा, अस्मितेचा प्रश्न आहे अशी काहीशी वृत्ती ह्यांच्यामागे असते. लेखकाच्या दृष्टीपुढे एक विशिष्ट वाचकवर्ग असतो आणि त्याच्या जिज्ञासेचे समाधान करण्यासाठी काही विषयावर त्यांच्या चालू असलेल्या विचारात भर घालण्यासाठी, त्याला एक विशिष्ट वळण देण्यासाठी म्हणून तो लिहीत असतो अशी परिस्थिती नसते. म्हणजे ही सारी प्रक्रिया कृत्रिम असते, स्वाभाविक नसते, विचारांचे प्रदान-आदान येथे घडत नाही; केवळ प्रदान घडते.

ह्या परिस्थितीमुळे इंग्रजी हे पर्यायी माध्यम म्हणून का होईना पण चालू राखावे ह्या भूमिकेच्या समर्थनासाठी करण्यात येणाऱ्या एका युक्तिवादाला बळकटी येते. हा युक्तिवाद असा की व्यासंगी, विद्यार्थ्यांची जिज्ञासा जागृत करून तिचे समाधान करू शकणारे, त्यांच्या बुद्धीला शिस्त लावणारे, ज्ञानाविषयीची, बौद्धिक मानदंडाविषयी आस्था हा त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा भाग बनविणारे असे निदान काही प्राध्यापक भारतात आहेत आणि त्यांच्यापासून स्फूर्ती घेऊ शकणारे काही विद्यार्थीही आहेत. ह्या प्राध्यापकांना आणि विद्यार्थ्यांना त्यांच्या व्यासंगाच्या विषयांतील नवीन ज्ञानाच्या आणि विचारांच्या मूलस्रोतापासून कोणत्याही रीतीने अलग राखणे घातक ठरेल प्रादेशिक भाषा माध्यम म्हणून ह्यांच्यावर लादल्या तर ह्यांचे पंख छाटले जातील. देशाचा कारभार — केवळ दैनंदिन राज्यकारभार नव्हे तर राष्ट्रीय जीवनातील सर्वच क्षेत्रांत, आर्थिक, सामाजिक, सांस्कृतिक क्षेत्रात व्यवहाराला नवीन दिशा आणि गती देणारे निर्णय घेणे आणि अंमलात आणणे ह्या स्वरूपाचा कारभार — जर कार्यक्षमपणे चालायचा असेल तर अद्ययावत्, सर्वोत्कृष्ट ज्ञानावर आणि बौद्धिक तंत्रांवर पूर्ण हुकमत असलेल्या व्यक्ती पुरेशा संख्येने देशात असल्या पाहिजेत. आजच्या शिक्षणपद्धतीमुळे ही जायबंदी होणार नाही अशा ताकदीची बुद्धिमत्ता आणि जिज्ञासा असलेल्या विद्यार्थ्यांना इंग्रजी भाषा जवळजवळ मातृभाषेइतकी चांगली अवगत असेल अशी व्यवस्था करून देऊन इंग्रजी पुस्तकांनी भरलेल्या ग्रंथालयात सोडून देणे हाच ह्या स्वरूपाचे तज्ज्ञ निर्माण करण्याचा मार्ग आहे. ह्या विद्यार्थ्यांपैकी काही सुदैवी विद्यार्थ्यांची समानशील प्राध्यापकांशी गाठ पडेल आणि त्यांच्या बौद्धिक विकासाला चालना मिळेल. कित्येकांना आय्. आय्. टी. सारख्या पहिल्या दर्जाच्या संस्था स्थापन करून त्यांच्या बुद्धिमत्तेला साजेल असे शिक्षण देता येईल. अनेकजण पदव्युत्तर शिक्षणासाठी प्रगत देशात जाऊन अद्ययावत् ज्ञान संपादन करू शकतील. पण ह्या सर्व रचनेचा बुद्धिमान् आणि कर्तबगार विद्यार्थ्याचा इंग्रजी भाषा आणि ह्या भाषेतील विविध साहित्य ह्यांच्याशी असलेला दाट परिचय हाच असतो. आणि हा पाया आपण उखडता कामा नये. हा युक्तिवाद बहुतेकजण प्रकटपणे किंवा सुप्तपणे मान्य करतात.

सारांश, देशात दुहेरी शिक्षणपद्धती चालू आहे. देशातील बौद्धिक अभिजनांच्या ( elite ) शिक्षणासाठी इंग्रजी माध्यमाचा आधार घेणारी शिक्षणपद्धती हा तिचा एक भाग. ( हिच्यात बुद्धीने सुमार असलेले खूप विद्यार्थी प्रविष्ट असतात पण ही प्रामुख्याने भावी बौद्धिक अभिजनांची आवश्यक ती पूर्वतयारी करून देण्याचे कार्य पार पाडते. ) दुसरी, बहुसंख्य विद्यार्थ्यांसाठी चालविण्यात येणारी शिक्षणपद्धती. हिचे माध्यम प्रादेशिक भाषा असते. ह्या दुहेरी पद्धतीत अन्याय असला तरी तिला व्यवहार्य असा पर्याय ताबडतोब किंवा नजिकच्या भविष्यात तरी संघटित करता येईल असे दिसत नाही.

ह्या दुहेरी शिक्षणपद्धतीत केवळ अन्यायच आहे असे नाही तर तिच्यामुळे बहुजनसमाजातील बहुसंख्य विद्यार्थ्यांची बुद्धिमत्ता व कर्तबगारी वाया जाते. आज बहुजनसमाजातील, विशेषतः दलित समाजातील हुषार विद्यार्थ्यांत अनेक विषयांविषयी, उदा. भारताचा सांस्कृतिक इतिहास, धर्म, सामाजिक मूल्ये, आर्थिक व्यवस्था, राज्यघटनेची तत्त्वे, इ. खरीखुरी जिज्ञासा स्वाभाविकपणे असते पण कसदार अध्यापनाच्या अभावी आणि ह्या विषयांचे विवेचन करणारे दर्जेदार साहित्य मराठीत



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

उपलब्ध नसल्यामुळे ती विफल ठरते. अध्यापनाचा कस सुधारीत नेणे ही विद्यापीठांची आणि प्राध्यापकांची सांघिक, व्यावसायिक जबाबदारी आहे. तिच्याकडे त्यांनी गंभीरपणे लक्ष दिले आणि पदवी परीक्षेपर्यंतच्या अभ्यासासाठी म्हणून जे साहित्य इंग्रजी भाषेतून शिकणारा बुद्धिमान विद्यार्थी वाचेल ते सर्व मराठीतून उपलब्ध करून देण्याचा कार्यक्रम आखून पार पाडला तर ह्या दोन शिक्षण-पद्धतींमधील अंतर हळूहळू कमी करता येईल. हुषार, जिज्ञासू अशा बहुजनसमाजातील विद्यार्थ्यांचा बौद्धिक कोंडमारा होऊ नये ह्यासाठी असा कार्यक्रम नेटाने आणि जलद रीतीने पार पाडणे आवश्यक झाले आहे.

---


**नवभारत मे १९७८**

## मद्य व सांस्कृतिक जीवन विशेषांक

मद्यविषयक विधिनिषेध हे सर्व काळातील सर्व समाजांच्या व्यवस्थेचे एक सनातन अंग होय. भारतीय व भारतीयेतर नव्याजुन्या संस्कृतीत अशा विधिनिषेधांचे व त्यांच्या साकल्यात्मक प्रभावाचे स्वरूप कसे होते, यासंबंधीचे सांगोपांग विवेचन करणारे उद्बोधक लेख ह्या विशेषांकात असतील. अशा प्रकारचा हा मराठीतील पहिला व समयोचितही विशेषांक ठरावा !

— कार्यकारी संपादक
'नवभारत' मासिक




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

# आमची अमेरिकेची यात्रा

(जानेवारी–फेब्रुवारी १९७८ वरून चालू)

---

१४ जुलै १९७७ – आज मुक्काम चि. सौ. मालतीकडे पुकिप्सी उपनगर फिशकिल येथे आहे. चि. डॉ. अशोक जोशी माझा पुतण्या बॉस्टन (बर्लिंग्टन) हून स्वतःच्या मोटारीने आम्हा सर्वांना बॉस्टनला नेण्याकरिता आला. तो बॉस्टन येथील सर्व प्रकारच्या विजेऱ्यां-(बॅटऱ्यां)ना लागणारे विविधप्रकारचे आतले भाग सेल्स बनविणाऱ्या जगातल्या सर्वात मोठ्या मॅलरी कंपनीच्या कारखान्यात तंत्रज्ञ म्हणून गेली ३ वर्षे काम करीत आहे. त्याचा डॉक्टरेटचा निबंध नॉटोच्या तंत्रज्ञांना पसंत पडला म्हणून या कारखान्याच्या कंपनीने खूप खटपट करून कायम विसा, या देशी राहण्याचा परवाना, मिळवून दिला. अलीकडे भारतासारख्या श्यामवर्णी वा कृष्णवर्णी देशातील नागरिकांना येथे राहण्याचा परवाना मिळविणे कठिण झाले आहे. अधिक बंधने शासकीय कामगारसंघटनेने लादली आहेत. बॉस्टन मी पूर्वी १९६४ साली पाहिले होते. परंतु पुनः पाहण्याचे ठरविले. हे अमेरिकेच्या स्वातंत्र्यसंग्रामाचे महत्त्वाचे केंद्र म्हणून प्रसिद्ध आहे.

एक-दोन आठवडे उशिरा बॉस्टनला जाण्याचा बेत ठरविला होता. परंतु महाराष्ट्राचे मुख्यमंत्री श्री. वसंतदादा पाटील व भारताचे प्रधानमंत्री श्री. मोरारजी देसाई यांचा निरोप तारेने आला की, मराठी विश्वकोश (पहिले ५ खंड) प्रकाशनाची ता. २४ जुलै ठरली आहे. श्री. राम कोल्हटकर माझे स्वीयसहायक यांचाही टेलिफोन दोनदा आला. पहिल्यांदा आला तो चि. मुरलीधरपंतांनी घेतला. त्यात पाहिजे तो खुलासा मला नीट कळला नाही; दुसऱ्यांदा आलेला टेलिफोन मीच रात्री २॥ च्या सुमारास घेतला. २० प्रयाणाची तारीख ठरली. आणखी अधिक तीन आठवडे येथे राहणार होतो. ठरलेला सर्व कार्यक्रम आता आटोपता घ्यावा लागला. बॉस्टनला त्वरित जाण्याचे ठरविले. मुरलीधरपंत, चि. सौ. मालती व मधुकरचा सर्व परिवार असे आम्ही दोन मोठ्या मोटारी काढून अशोकबरोबर बास्टनला उद्या ता. १५ जुलैला निघण्याचे ठरविले.

१५ जुलै १९७७ – चि. अशोकची इंपाला व मधूची बडी फोर्ड या दोन्ही मोठ्या मोटारीत आम्ही सर्वजण मावलो. सर्वांनी विमानातल्या प्रमाणे पट्टे आवळले. पट्टे आवळलेच पाहिजेत; असे आम्हास मधूने सुनावले. मी म्हटले की, आम्ही न चुकता बसल्याबरोबर पट्टे आवळतो; इतके निक्षून दरवेळी पुनः पुनः कशाला सांगतोस? मधू म्हणाला, त्या-संबंधी काही विशेष माहिती तुम्हास माहीत नसल्यास सांगावी, असा या सांगण्यामागचा उद्देश आहे. भारतातल्या मोटारींना पट्टे नसतात याचे कारण, भारतात मोटारी विशेष वेगाने चालविल्या जात नाहीत. भारतातले रस्ते अरुंद; एकतर्फी, एकमुखी गल्ल्या असलेले मार्ग क्वचित. काही महामार्गांनाच मोठ्या शहरांजवळच एकमुखी एकतर्फी गल्ल्या असतात – बहुतेक मार्गांमध्ये समोरून येणारी वाहाने चुकवून, टक्कर होऊ नये म्हणून, गाड्या जपून हळू चालवाव्या लागतात; तसे येथे नाही. ताशी ५५ मैलीच वेग ठेवण्याचा नियम असला तरी बहुतेक गाड्या ६० ते ७० मैली वेगाने भरधाव जातात; महामार्गांना देशभर ४–६ गल्ल्या असतातच. त्यामुळे समोरून येणाऱ्या गाड्यांच्या टक्करींचे भय नसते. वेग एकदम आवरण्याची

न भा. १









राज्य मराठी विकास संस्थेद्वारे
संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

पाळी केव्हा येईल याचा नेम नसतो. एखादी गाडी नादुरुस्त झाली, आडवी कोसळली तर, गाड्यांच्या मैलोनमैल रांगा लागून वाहतूक बंद पडते. गाडी एकदम थबकली तर बैठकीवर बसलेल्या स्वाऱ्या धक्का बसून उसळतात; हबका बसतो; हातापायाना व डोक्याला मार बसून अपघात होतो. तो टाळण्याकरिता या पक्क्या पट्ट्यांचा उपयोग होतो, शरीराला इजा पोचत नाही. विशेषतः मागच्या स्वाऱ्यांपेक्षा पुढे म्हणजे एंजिनच्या जवळ बसणाऱ्या स्वाऱ्यांच्या अपघातांचे प्रमाण सुमारे तिप्पट असते. समोर बसलेल्या, पट्टे बांधणाऱ्या स्वाऱ्यांच्या अपघातांचे प्रमाण पट्टे न बांधणाऱ्यांपेक्षा फारच कमी म्हणजे सात दशांश इतके कमी असते. हा हिशेब भारतातल्या मंडळीना माहीत नसतो. म्हणून मी ही माहिती सांगण्याकरिता मुद्दाम इषारा प्रत्येक वेळी देतो.

सुमारे दीडशे मैल अंतरावर बॉस्टनपर्यंत गप्पागोष्टी करत ६ तासात पोचलो. मध्ये दोनदा उतरलो. रस्त्याच्या बाजूला असलेल्या सुरेख उपाहारगृहांमध्ये चहा, कॉफी व इतर पदार्थांचे सेवन केले. वनविहार केला.

बर्लिंगटनला (बॉस्टन) दुपारी एक वाजता पोचलो. येथे अशोकचे बिऱ्हाड एका उपवनात आहे, सौ. चि. सुरेखाने स्वयंपाक तयार ठेवला होता. राधा व सोपान बाहेरच्या हिरवळीवर खेळत होते. राधा व सोपान ही बालके अशोकला पाहिल्याबरोबर पपा! म्हणून, धावत व हसत येऊन चिकटली; पापा घेतला. अशोकने दारावरची बेल दाबली; सुरेखाने दार उघडले. सुरेख गालीच्यावरील सोफा व खुर्च्यांवर टेकलो. नंतर थोड्या वेळात अमेरिकन-भारतीय साग्रसंगीत भोजन झाले.

दुपारनंतरचा सगळा दिवस विश्रांती व चर्चा यांमध्ये गेला. हारवर्ड विद्यापीठ बॉस्टनला लागून आहे. मला तेथील संस्कृतचे प्रधान प्राध्यापक डॉ. एंगॉल्सना भेटण्याची इच्छा होती. ते नव्यन्यायाचे प्रख्यात पश्चिमी पंडित व त्यांचे शिष्य डॉ. मतिलाल नव्यन्यायाचे बंगाली पंडित; या दोघांना मी १९६४ च्या अमेरिकेच्या भेटीत भेटलो होतो. डॉ. एंगॉल्सची भेट तत्पूर्वी भारतात ते असताना पुणे येथे भांडारकर ओरिएंटल इन्स्टिटयूट मध्ये झाली होती; ही भेट डॉ. दांडेकरांनी नव्यन्यायाच्या चर्चेकरिता घडवून आणली होती. चर्चेत मतभेदही झाले ते केव्हाच मिटले नाहीत. परंतु त्याचा आम्हा दोघांना चांगलाच फायदा झाला. १९६४ साली न्यूयॉर्क येथे अमेरिकन ओरिएंटल सोसायटीची वार्षिक बैठक होती. या बैठकीत डॉ. मतिलालनी 'अवच्छेदकत्वाचे ६ अर्थ' हा निबंध वाचला होता; त्याचप्रमाणे पेन्सिल्वानिया विद्यापीठाचे डॉ. नॉर्मन ब्राऊन यांनी ऋग्वेदाच्या नासदीय सूक्तावर निबंध वाचला होता. मी या दोन्ही निबंधावर माझे मत व मतभेद या बैठकीत मांडले होते. ही सर्व आठवण मला यावेळी झाली. यावेळी चवकशी केली तेव्हा कळले की, डॉ. एंगॉल्स आता उद्योगधंद्यात गर्क झाले आहेत; त्यांनी २५ लाख डॉलर धंद्यात गुंतवले आहेत; खूप श्रीमंत झाले आहेत. डॉ. मतिलाल यांना इंग्लंडच्या ऑक्सफोर्ड विद्यापीठात भारतीय तत्त्वज्ञानाच्या स्पॅलिंग आसनावर मुख्य प्राध्यापक म्हणून नेमले आहे. याच जागी माजी राष्ट्रपती कै. प्रा. राधाकृष्णन् यांची नेमणूक झाली होती, हे ऐकून मला आनंद झाला. परंतु डॉ. एंगॉल्ससारखे संस्कृत संशोधक संशोधनाबाहेरच्या लक्ष्मीपतिपदाकडे आकर्षित झाले हे ऐकून किंचित खिन्नताही मनाला स्पर्शून गेली. भगवान विष्णूचे 'मोहिनी' हे स्वरूप पुराणे वर्णितात; लक्ष्मी हेच भगवंताचे खरेखुरे 'मोहिनी' हे स्वरूप होय! हे चटकन मनात आले व मन शांत झाले. हेच मोहिनीरूप मोठमोठ्या बलाढ्य असुरांना, त्यागी स्वातंत्र्यवीरांना किंवहुना साधुसंत योग्यांना भुलविते, तेथे आमच्यासारख्या पामरांचा काय पाड!

डॉ. एंगॉल्सना भेटण्याच्या पाठीमागे त्यांच्याशी एका महत्त्वाच्या विषयावर चर्चा करावी हा एकच उद्देश होता. त्यांनी १९६४ साली हार्वर्ड विद्यापीठाच्या राज्यशास्त्र विभागात वाचलेल्या लेखाची छापील प्रत मला दिली होती. त्यात त्यांनी अत्यंत महत्त्वाचा पण त्यावेळी अगदी न पटणारा मुद्दा असा मांडला होता की, "आशियातील भारतासारख्या देशात आज संसदीय लोकशाही स्थापित झालेली दिसत असली तरी ती फार काळ टिकणार नाही. सबंध आशियातच राजकीय





राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

लोकशाहीस अनुकूल सांस्कृतिक परंपरा नाही. हजारो वर्षांच्या इतिहासात केवळ वंशपरंपरागत राजसिंहासनावरील निष्ठा हीच जनतेच्या असंज्ञ मनात खोल रुजली आहे. कोणी वंशपरंपरागत राजवट निर्माण केली तर जनतेच्या मनोभूमीशी ती अधिक संवादी ठरेल." मी एंगॉल्सना भेटलो तेव्हा त्यांचा हा भविष्यवाद मला पटला नव्हता परंतु आता पटू लागला आहे; "इंदिरा गांधींना पहिल्या झटक्यात एकदम लोकप्रियता व प्रचंड पाठिंबा लाभला; डावे-उजवे लोकशाहीवादी, समाजवादी तरुणतुर्क, भारतीय कम्युनिस्ट, भांडवलदार इ. झाडून सगळे प्रधानमंत्रीपदावर इंदिराजी चढल्याबरोबर डोक्यावर उचलून धरू लागले. आणीबाणी व अधिकारशाहीकडे नेणारी ४२ वी दुरुस्ती हे त्याचेच पर्यवसान होय. कै. पं. जवाहरलाल नेहरूंना या खोल भारतीय राजनिष्ठेच्या संस्काराचा मनोमनी नीट अंदाज आला असावा. म्हणून इंदिराजींना त्यांनी महत्त्वाची अधिकारपदे, वरिष्ठ सहकाऱ्यांचा विरोध लक्षात असतानाही ती न जुमानता, बहाल करण्याचा सपाटा लावला." हे सर्व मी एंगॉल्सशी बोलणार होतो व याबद्दल बधाई देणार होतो.

छोटचा ५ वर्षांच्या राधेची, ती समोर दिसेना म्हणून, मी चवकशी केली. २ वर्षांचा सोपान तेथेच आमच्या भोवती लक्ष्मी व शीला यांच्या जवळ हसत खेळत उड्या मारत होता. त्याला मी 'राधा कोठे आहे' हे इंग्रजीत विचारले. त्याने 'कोणास ठाऊक!' असे नाजुक हातवारे करून उत्तर दिले. सुरेखाने राधेला तिच्या मैत्रिणीकडून शोधून आणले आणि हात धरून जबरदस्तीने आणून आमच्या पुढे उभे केले; आणि सुरेखा म्हणाली :– "ही पोर अशीच एकदा या भोवतालच्या बंगल्यांच्या ओळीने लागलेल्या रांगांमध्ये आम्हास सापडेनाशी झाली. जवळच्या रांगेतील बंगले सोडून पाठीमागच्या बंगल्याच्या ओळीत कधीच जात नाही म्हणून या ओळीतील बंगले झाडून शोधले; पण सापडली नाही. आम्ही दोघे चिंतेत पडलो. पोलिसला फोन केला. ४ पोलिस एक कुत्रा घेऊन आले. त्या कुत्र्याला पोलिसांनी राधेच्या कपडयांचा वास दिला. त्या कुत्र्याने दोनतीन वेळा हुंगले व लगेच निसटला. मागच्या एका रांगेतील बंगल्यात शिरला. त्याच्या पाठीमागे एक पोलिस गेला. १५ मिनिटात त्या कुत्र्याने राधेचा सुगावा काढला. शिपायाने कडेवर घेऊन राधेला आमच्यापुढे उभे केले! असली ही भटकणारी पोरगी आहे."

१६ जुलै १९७७ सकाळ पासून संध्याकाळ पर्यंत पाहता येईल तितकी बॉस्टनची सुंदर व भव्य स्थळे पहात हिंडलो. दोन विशेष स्थळे ध्यानात कायम राहतील अशी पाहिली. ती म्हणजे स्थलजल संचारी माशांचे क्रीडासरोवर व समुद्रातील जिवंत प्राण्यांचा ६ मजली विहारमहाल. हा एक एक उभय संचारी मासा ३ शे ते ६ शे किलो वजनाचा. या माशांच्या खेळाचे मोठे प्रेक्षागार येथे आहे. त्यात प्रत्येकवेळी हजार प्रेक्षक दोन्ही बाजूला बसतील अशा शिडचांची उतरण्ड आहे. व मध्ये या माशांच्या क्रीडेच्या तळयाजवळ त्यांना खेळविणाऱ्या मदाऱ्यांना उभे राहण्याकरिता तक्ते. एक मदारी पुढे येतो, इषारा देतो, जवळच्या विहारजलाशयातून खळबळ ऐकू येते; दोन मासे या छोटचा तळचात शिरतात. मदाऱ्याने दिलेल्या निरनिराळचा इषाऱ्यांबरहुकूम अंतरिक्षात सरळ उंच उडचा, १० ते १५ पंधरा हात उंचावर धरलेले भक्ष्य पकडण्याकरिता घेतलेल्या बिनचूक उडचा, कोलांटचा उडचा, पाण्यातल्या सुरकांडचा व डुबक्या, एकमेकांचा पाठलाग, इत्यादी क्रीडाप्रकार पाहिले. हे स्थलजलचर चांगले शिकतात. मनुष्येतर अनेक प्राणी चांगले शिकतात हे आपणास सर्कशींच्या जगभर चाललेल्या, भरभराटीस आलेल्या धंद्यावरून लक्षात येते. मानवाबाहेरच्या जाणिवेच्या क्षेत्राचा विशाल विविध विस्तार व स्तर ध्यानात भरतात. प्राणी व वनस्पती सृष्टीतील प्रत्येक व्यक्तीत चैतन्य भरून राहिलेले प्रत्ययास येते. त्या बाहेरच्या तथाकथित अजीव सृष्टीत, समष्टीत चैतन्याचा विलक्षण भास होतो.

सर्वजण तिसऱ्या प्रहरी ३ वाजता सागरसंचारी जिवंत प्राण्यांच्या ६ मजली गोल महालात शिरलो. रंगीबेरंगी छोटचा भिन्न भिन्न आकाराच्या प्राण्यांचे थवे काचेच्या मोठमोठचा लोखंडी कपाटात खालीवर येथे संथ विहार करीत आहेत; ही कपाटे कडेच्या भिंतीत बसवलेली आहेत. मधल्या गोल गोल तळचांमध्ये मध्यम आकाराचे शेकडो जातीचे मासे


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

व निरनिराळ्या प्रकारचे कासव खालीवर संचार करीत आहेत. येथे आमचा परिवार ही रमणीय दृश्ये पहात, फलकांवरची माहिती वाचत पांगला होता. लक्ष्मी व छोटी शीला कोणत्या मजल्यावर आहे हेही पाहण्यास आम्ही विसरलो. लक्ष्मी व शीला येथे अनेक वेळा ही दृश्ये पाहून गेल्या तरी त्या येथे ही दृश्ये पुन: पाहण्यात आमची संगत सोडून हिंडत होत्या. संध्याकाळ झाली तेव्हा आम्ही या मुलींना शोधू लागलो. सौ. इंदु म्हणाली काळजी करू नका; त्या आता लवकर भेटतील. आम्ही सहाव्या मजल्यावरून खाली उतरत असता या मुली चवथ्या मजल्यावर दिसल्या त्या त्वरित परतण्यास नाखुष होत्या. मी म्हटले, तुम्ही पुन: येथे या; पण आता आमच्याबरोबर परता. आम्ही ७ वाजता संध्याकाळी घरी परतलो.

१७–२० जुलै १९७७ :– मला २० जुलैला संध्याकाळच्या विमानाने भारताकडे परत फिरायचे होते. म्हणून आणखी दुसरीकडे जाण्याचा बेत रहित केला. फिशकिल न्यूयॉर्क विमानपत्तनाला जवळचे, म्हणून फिशकिलला मालतीच्या घरीच येऊन राहिलो.

१९ जुलैला चि. अशोक सर्व परिवारासह मला निरोप देण्यास आला. दोन्ही कुटुंबातली मंडळी एकत्र जमली. चि. मधूने व अशोकने निरनिराळ्या प्रश्नांवर माझ्याशी चर्चा केली. मधू भगवद्गीतेवर येथील भारतीय समाजात भाषणे करतो. त्याने मला प्रश्न विचारला–अबा, भगवद्गीतेतील एक श्लोक मला खूप खटकतो. तो म्हणजे 'कर्मण्येवाधिकारस्ते' हा श्लोक, ही किती रूक्ष आज्ञा आहे. त्यात मनाला बोध देऊन समजावून पटवून देण्याचे मार्दव नाही. लोकमान्य टिळकांनीतर हा श्लोक गीतेचे सार म्हणून गौरविलेला आहे. मी त्वरित क्षणभरही न थांबता सांगितले की, रणांगणावर हुकमाची भाषा असते. तेथे युक्तिवाद व खुलविणारे विवरण करणे यास वेळ नसतो; एवढेच नव्हे; तर तेथे केवळ जबरदस्त जोमदार इषारा देणारा हुकूमच आवश्यक व युक्तिसंगत ठरतो. इस्लामचा धर्मग्रंथ असाच आहे. आक्रमक लष्करी धर्मसंघटनांचे ते आदेश असतात. लोकमान्य टिळक हे स्वातंत्र्यसंग्रामाला प्रवृत्तकरणारे ब्रिटिशांच्या पारतंत्र्यातले पहिले महापुरुष होत. त्याना हा श्लोक सारभूत वाटला याचे कारण त्यांचा आक्रमक बाणा होय. त्यांचे मन लढाऊ वृत्तीने भरलेले व भारलेले होते." इंदू आमचा हा संवाद खूप लक्ष देऊन ऐकत होती. माझे हे समर्थन तिला एकदम पटले व तिने संमतीदर्शक मान चटकन हलविली.

या चर्चेच्या वेळी अशोकने दुसराच मुद्दा उपस्थित केला. अशोक म्हणाला – आबा, तुम्हाला मी येथे किती तरी वेळा सकाळ, दुपार, संध्याकाळ, त्रिकाळ पाहतो. तुम्ही आता ७७ वर्षांचे; पण केव्हाच थकलेले दिसले नाहीत; विश्रांती घ्यावीशी तुम्हास वाटत नाही; प्रवासात आम्हा तरुणांच्या बरोबरीने चालता, कामे करता, याचे रहस्य सांगाल काय? 'रहस्य असे काही नाही,' मी म्हटले. 'अशोक अशा प्रश्नांचे उत्तर नेमके सांगता येत नसते. तुम्ही मला तुमच्या बालवयापासून पहात आहा. तुम्ही विचार केलात तर काहीसे उत्तर तुम्हास सापडेल. एक गोष्ट अशी की, माझ्या वडिलांनी म्हणजे तुझ्या आजोबांनी माझे पालनपोषण अत्यंत शास्त्रोक्त पद्धतीने केले, हे याचे एक कारण असू शकेल. घरची अगदी मध्यम स्थिती. हलाखीची नव्हे. घरात गाईचे दूधदुभते भरपूर व कायम होते. तेव्हा घरी चहा होत नव्हता. हातकांडीचे तांदूळ व हातदळणाचे पीठ, सगळे पेय भक्ष्य आस्वाद्य अन्नपदार्थ यंत्रस्पर्शीवाचूनचे ताजे होते. बंद बाटल्यातले पदार्थ आम्हास माहीत नव्हते. दुसरे असे की, ९ व्या वर्षी वेदाध्ययनास प्रारंभ होण्यापूर्वी दिवसभर सवंगड्यांबरोबर आमच्या खेड्यातील उघड्या मैदानात, प्राथमिक शाळेतील वर्गाची वेळ सोडून, खेळत होतो. मौंजीबंधन झाल्यावर ४–५ तास वेदपठण चाले. तो एक चांगला व्यायाम असतो. सूर्य नमस्कार, आसने व प्राणायाम या गोष्टी वडिलांनी शिकविल्या व माझ्या हातून याबाबतीत चुकारपणा होणार नाही, याबद्दल दक्ष राहिले. १४ व्या वर्षी वाईस प्राज्ञपाठशाळेत येऊन दाखल झालो. या पाठशाळेच्या कार्यक्रमात सूर्यनमस्कार, आसने, आखाडा व इतर मैदानी खेळ अंतर्भूत होते. मैदानी खेळात व आखाड्यात माझा क्रमांक, पोहण्याचा कार्यक्रम सोडल्यास, खूप खालचा असे. मलखांब आला नाही वा कुस्ती

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

जमली नाही. परंतु पोहण्यात कृष्णेच्या पुरात पोहणाऱ्या मी मी म्हणणाऱ्या वाईकरांस एकदोनदा मी चकित केले. कृष्णेच्या पुरात ( पहिले लहान पूर येऊन गेल्यानंतर ) ५ मैलावरच्या धोमच्या डोहात उडी घालून दोनदा अथकपणे पोहत आलो. यात श्रम कमी परंतु धाडस फार लागते. वाईस आल्यापासून ५–६ मैल माझे फिरणे मधून मधून असतेच. मानसिकदृष्टचा महत्त्वाचा मुद्दा असा की, माझ्या वडिलांनी रामविजय, हरिविजय, भक्तलीलामृत, महाभारत, रामायणाची भाषांतरे व इतर धार्मिक साहित्याची गोडी लावली. ती वाईस आल्यावर वाढली. नंतर संस्कृतमधील शास्त्रीय ग्रंथांचे अध्ययन व पठण केले. त्याची रुची आतापर्यंत टिकली. त्यामुळे मन निरोगी राहिले. योगाभ्यास अजून चालू आहे.

अशोक पुढे म्हणाला – मला योग शिकवाल काय ? 'जरूर शिकवीन;' मी उत्तर दिले. यावर मधूने विचारले की, तुमच्या योगासनांचे फोटो आज घेऊ का ? त्याने चलत् कॅमेरा लावून माझ्या आसनांचे फोटो घेतले; परंतु मुरलीधरपंत म्हणाले की, मधूला कॅमेरा पद्धतशीर रीतीने लावता आला की नाही ही शंका आहे.

२० जुलै १९७७ – आज अमेरिकेहून निघायचे म्हणून सौ. चि. मालती व सासूसुनांनी चारी ठाव उत्तम स्वयंपाक केला. जेवण झाले. संध्याकाळी केनेडी विमानपत्तनावर आलो. सामान माहित असलेल्या ठराविक वजनापेक्षा अधिक होते. परंतु ते विमान कारकूनांनी आक्षेप न घेता रुजू केले.

सर्वच परिवार माझ्यापेक्षा लहान वयाचा. सर्वांनी पायापडून नमस्कार केला. फोटोचा कार्यक्रम झाला. माझ्या छोटचा नाती चि. लक्ष्मी व शीला यांना मी आंगाशी घट्ट धरले; फोटो झाले. माझी पत्नी सौ. सती इतक्यात माझ्याबरोबर येणार नसल्यामुळे तिने स्मित करून निरोप दिला. त्यावेळी इंदू व मालती यांच्यापाशी लक्ष्मीने आजी ( सती ) बद्दल हळूच तक्रार केली की आजी किती कठोर आहे; आजोबांचे चुंबन घेतले नाही ! मालती डोळे वटारून हळूच लक्ष्मीला म्हणाली, की मूर्ख मुली, निरोपाच्या वेळी चार चौघांदेखत नवऱ्याचे चुंबन घेण्याची प्रथा पश्चिमी आहे. भारतात असे केले तर लोक हसतील; छचोर म्हणतील.

मी सर्वांचा निरोप घेऊन ओळखीच्या अनेक भारतीय यात्रेकरूंसह विमानपत्तनाच्या प्रतीक्षागारात प्रवेश केला. हे भारतीय विमान १ तास उशिरा सुटले. २४ तासांनी तारीख २२ ला दिल्लीमार्गे मुंबईच्या विमानतळावर सकाळी आलो. विमानपत्तनाच्या सामानतपासणी कार्यालयातून दीड तासाने बाहेर आलो. अमेरिकेस जाताना निरोप ज्यानी दिला तीच बहुतेक मंडळी येथे स्वागतार्थ उपस्थित होती. त्यांच्यात पोपट देशपांडे, रंगोपंत कुलकर्णी, सौ. चि. सुमन, चि. चंद्रशेखरपंत व चि. अशोक खंडकर हे होतेच.

( समाप्त )

---


**छापत आहोत**

**मराठी दलित साहित्याची मूलगामी मीमांसा करणारा ग्रंथ**

**' निळी पहाट '**

लेखक : प्रा. रा. ग. जाधव

प्राज्ञपाठशाळा मंडळ, प्रकाशन, वाई


अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प. रा. दामले

# गांधीजी, हिंदुधर्म, व बुद्धिवाद :

दोन तीन वर्षापूर्वी गुजरात विद्यापीठात गांधीजींवर मी एक व्याख्यान देत असता श्रोत्यांपैकी प्रोफेसर सी. एन्. पटेल ( संपूर्ण गांधी वाङ्मयांचे उपमुख्य संपादक ) यांनी चर्चेकरिता एक मुद्दा मांडला. सॉक्रेटिस किंवा ॲरिस्टॉटल 'मॅन इज रॅशनल' असे ज्या अर्थी म्हणतो त्याच अर्थी 'मॅन इज गुड' असे गांधी म्हणतात, व ते तितकेच खरे आहे अशी भूमिका माझ्या विवेचनात घेतली होती. त्यास उद्देशून श्री. पटेल यांनी आपली भूमिका सांगितली ती अशी "गांधी ऐतिहासिक हिंदु धर्मातल्या उणिवा मान्य करीत, जरूर ती सुधारणा आचारातही करीत. पण तरीही मी हिंदूच आहे व गीता हा माझा मुख्य पारमार्थिक ग्रंथ आहे असे म्हणत. ही त्यांची भूमिका बुद्धिवादयाची नसून अंतःकरण प्रामाण्य मानणाऱ्याची आहे. गांधी 'हार्ट'ला आव्हान करीत 'रीझन'ला नव्हे. 'व बुद्धिवादयांना माझी भूमिका पटवून देण्यात मला यश आले नाही असे ते म्हणत. माणसे न समजताही गुड असू शकतात, पण न समजता कोणी रॅशनल असत नाही. जगात चांगली माणसे नक्की आहेत. शहाणी आहेत की नाही कुणास ठाऊक ! गांधींचा रीझनवर विश्वास असता तर त्यांनी हिंदुत्वाबद्दलचा आग्रह सोडून बुद्धीस पटणारा सर्वांस सामान्य असा मानवधर्म स्वीकारला असता". प्रा. पटेल यांच्या या विचारसरणीस पाठिंबा मिळेल अशी एक घटना त्यावेळी नुकतीच माझ्या अनुभवास आली होती. गांधींचे अनुयायी व सहकारी श्री. शंकरलाल बँकर यांची व माझी दोनचार दिवसच आधी भेट झाली होती. त्यावेळी गांधी यांचा माणसांच्या चांगुलपणावर विश्वास असून ते नेहमी 'हृदयपरिवर्तन' कसे होईल याकडे लक्ष देत असत, असे ते मला म्हणाले. व त्यांच्या म्हणण्याप्रमाणे पंडित जवाहरलाल, सरदार पटेल, राजाजी इत्यादी अव्वल दर्जाच्या बुद्धिमान व कर्तबगार व्यक्ती गांधींनी आपल्या केल्या, ते त्यांच्या बुद्धीपेक्षा हृदयाला आव्हान देऊन. या संदर्भात श्री. बँकर यांनी मला एक विशेष आठवण सांगितली. गोपीनाथ सहा या क्रांतिकारक देशभक्ताच्या हिंसाविषयक कृतीबद्दल गांधीजींच्या सूचनेवरून अखिल भारतीय कॉंग्रेस समितीमध्ये एक निषेधाचा प्रस्ताव मांडला गेला. त्यास देशबंधुदास व पंडित मोतीलाल नेहरू यांनी विरोध केला. तरीही गांधीच्या व्यक्तिमत्त्वामुळे तो बहुमतानें संमत झाला. परंतु गांधी त्या घटनेमुळे फार अस्वस्थ झाले. मौलाना शौकत अली त्यांना म्हणाले, 'तुम्ही काळजी कसली करिता ? बहुमत आपले आहे व आपलेच राहील, दास–नेहरुंना आपण सहज बाजूला टाकू शकू'. गांधींनी उत्तर दिले की, "त्याचा काय उपयोग आहे ? जोपर्यंत त्यांच्यासारख्या सच्च्या देशभक्तांना माझे म्हणणे पटत नाही तोपर्यंत मला अपयशच आले असे म्हटले पाहिजे. माझा त्यांच्यावर राग नाही, परंतु मला अतिशय खेद होत आहे." गांधींचा हा दृष्टिकोन व ज्यांशी मतभेद झाला त्यांच्याबद्दलचा हा सद्भाव यामुळेच नंतर मतभेद असूनही दास व मोतीलाल दोघेही गांधींच्या मतालाच पाठिंबा देऊ लागले. पंडित जवाहरलाल यांनी अनेकवेळा आपल्या आत्मचरित्रात असे नमूद केले आहे की अनेक वेळा तीव्र मतभेद असूनही आपण गांधीच्या "आतल्या आवाजाला" पाठिंबा दिला. व परिणामी गांधीजीच बरोबर होते असे प्रत्ययास आले. गांधी स्वतः नेहमी निक्षून आश्रमांतील अनुयायांना व इतर राजकीय नेत्यांना मी म्हणतो

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

हे 'तुम्हांस माझें म्हणणे पटत असले तरच ही म्हणा, अन्यथा नको व उलट तुम्ही तुमची भूमिका बरोबर आहे अशी माझी खात्री केली तर मी माझी भूमिका सोडून तुमचीच स्वीकारीन व ज्यांना खऱ्या अर्थी Rational म्हणतां येईल त्याचेच हे वैशिष्टच आहे. गांधींच्या बारीक सारीक तपशिलाच्या भूमिकांना हे लागू नसले तरी मनुष्याचा खरा स्वभाव काय आहे व म्हणून त्याची प्रगती सर्वोदय समाज निर्मितीनेच होईल या त्यांच्या मूलभूत भूमिकेबद्दल हे खात्रीने म्हणता येईल.

अशी आणखीही उदाहरणे देता येतील, परंतु त्याचा अन्वयार्थ काय लावावयाचा हा प्रश्न आहे. माझ्या मते गांधीजींचे 'हार्ट' व सॉक्रेटिसाचे 'रीझन' ही एकच आहेत. दोन दृष्टिकोनातून हे दोघे एकाच वस्तुबद्दल बोलत आहेत. सर्व माणसात जी एक मूलभूत सामान्य प्रवृत्ती आहे- सामान्य दृष्टिकोन आहे त्याचाच हे दोघे उल्लेख करीत आहेत व दोघांच्याही विधानात एकाच अर्थी वस्तु-निष्ठता आहे. तसे म्हटले तर माणसे शहाणी तरी कोठे असतात, बहुतेक नसतातच. परंतु ती शहाणी 'होऊ शकतात' इतकाच 'रॅशनल'चा अर्थ आहे. व गांधीजी, मनुष्यप्राणी स्वाभाविकपणे 'गुड' असतो असे म्हणतात त्याचाही अर्थ इतकाच की मनात आणले व आपल्या मूलभूत प्रवृत्तीला त्यांनी अवसर दिला म्हणजे ती 'गुड' होऊ शकतात. पशूंना 'गुड' किंवा 'रॅशनल' होता येत नाही. व माणसाचे वैशिष्टच त्याला 'असे होता येते' हेच आहे. उलट प्रा. पटेल समजतात त्याप्रमाणे जगात प्रत्यक्ष सद्गुणी माणसे पुष्कळ आहेत हेही खरे नाही. एका अर्थी शहाण्या माणसांपेक्षाही ती कमी असतात. शहाणे लोक मिळू शकतात. पण खरा चांगला मनुष्य मिळत नाही. सुभाषितात "शतेषु जायते वीरः, सहस्रेषु जायते पंडितः, वक्ता दश-सहस्रेषु, दाता भवति वा न वा' असे म्हटलेच आहे.

आपल्याकडील सुशिक्षित व बुद्धिवादी म्हणवल्या जाणाऱ्या व्यक्तींचा गांधींना मिळावा तसा पाठिंबा मिळाला नाही ही गोष्ट खरी आहे. परंतु याचा दोष गांधींकडे नसून बुद्धिवाद्यांकडे आहे. तसे पाहिले तर सॉक्रेटिसाला सुद्धा त्यावेळचे बहुसंख्य विद्वान सो-फिस्ट यांचा विरोध होता व तो इतका प्रबळ होता की शेवटी आपले मतांकरिता सॉक्रेटिसास प्राणत्याग करावा लागला व तो त्याने खुषीने केला. सोफिस्ट स्वतःस बुद्धिवादी समजत पण ते फार उथळ अर्थी बुद्धिवादी आहेत असे सॉक्रेटिसाने दाखवून दिले. म्हणून त्यांचा त्याच्यावर राग होता. आज चाळीस-पंचेचाळीस वर्षे पुण्या-मुंबईत व इतरत्र मी अनेक बुद्धिवाद्यात वावरलो आहे व त्यातील पुष्कळांना खरोखरच आपल्या सामाजिक व राष्ट्रीय जीवनातील महत्त्वाच्या प्रश्नांची व समस्यांची उमज नाही असा माझा अनुभव आहे व खरोखर सॉक्रेटिसाने किंवा भर्तृहरीने म्हटल्याप्रमाणे अगदी उथळअर्थी ज्ञान असलेली ही मंडळी स्वतःला फार शहाणे समजतात व शिकायला तयार नसतात असे दृष्टोत्पत्तीस येते. गांधी हे प्रत्यक्ष कार्यकर्ते होते. त्यामुळे शाळा–कॉलेजात व ग्रंथात ज्या विशिष्ट पद्धतीने सिद्धान्त मांडले जातात तसे ते मांडीत नसत. परंतु त्यांचे लेख किंवा भाषणे वाचली असता तर्कदृष्ट्याही त्यांचे मूळ गृहीत कृत्य (मानवाचा चांगुलपणा) मान्य केल्यास निर्दोष असत. टिळक, रानडे, जवाहरलाल अशांसारखे गाढे विद्वान व विचारवंत ते वृत्तीनेच (तसे) नव्हते. परंतु त्यांची जी भूमिका होती ती भावनेवर अधिष्ठित नसून प्रामाणिक अनुभवातून उद्भवली होती व ज्यांना आपण 'रॅशनल' म्हणतो तेही बरोबर हेच करीत असतात. मी वर सांगितलेच आहे की माणूस 'रॅशनल' आहे हे इतक्याच अर्थी खरे आहे, की तो मनात आणील तर 'तो शहाणा होऊ शकतो.' म्हणजे तो पशु नाही इतकाच त्याचा खरा अर्थ होतो व गांधींच्या 'मॅन इज गुड' याचाही अर्थ तोच आहे. सुभाषितात सांगितलेच आहे की, "आहार, निद्रा भय मैथुनं च, सामान्यमेतद् पशुभिः नराणाम्, धर्मोहि तेषाम् अधिको विशेषः धर्मेण हीनाः पशुभिः समानाः।" या धर्म प्रवृत्तिलाच सॉक्रेटिस 'रीझन' म्हणतो व गांधी 'गुडनेस' किंवा 'लव्ह' म्हणतात. गांधींनी राजकीय क्षेत्रात जे महत्वाचे कार्य केले ते त्यांना सामान्य मनुष्यातल्या गुणदोषाचे चांगले ज्ञान होते व त्याला कोठचे मोह सामान्यतः अनावर होतात हे त्यांना उत्तम प्रकारे समजे, म्हणूनच शक्य झाले.

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

चर्चेच्या वेळी प्रा. पटेल यांनी दुसऱ्या एका संदर्भातून गांधीजींचा दृष्टिकोन 'रॅशनल' नसून 'इमोशनल' होता असे प्रतिपादन केले. प्रा. पटेल यांचे म्हणणे असे की ऐतिहासिक दृष्टचा व आजच्या सामान्य हिंदु नागरिकाच्या मध्ये अनेक दोष आहेत, हे माहित असूनही माझ्यापुरता हिंदुधर्म सर्व श्रेष्ठ असे ते नेहमी म्हणत राहिले. ते जर बुद्धिमार्गी असते तर इतर अनेक धर्माप्रमाणे हिंदु धर्मातही अनेक दोष आहेत हे लक्षात घेऊन गांधीजींनी स्वतः एक नवा निर्दोष व सर्व मानव-जातीला कल्याणकारक अशा धर्माचे प्रतिपादन केले असते व प्रस्थापनाचा प्रयत्न केला असता. माझ्या मते या बाबतीत गांधींनी केलेला खुलासा लक्षात घेतला तर प्रा. पटेल यांचा आक्षेप सहज दूर होतो. माझा धर्म हा हिंदु धर्मच, तो इतर धर्मापेक्षा श्रेष्ठ आहे म्हणून नव्हे तर तो माझा आहे म्हणून. जशी माझी पत्नी कस्तुरबाच, दुसरी कोणी नव्हे, याचा अर्थ कस्तुरबात दोष नव्हे असा नाही. या संदर्भात शिक्षणक्षेत्रातील माध्यमाच्या प्रश्नाबद्दल जी चर्चा चालते त्याची मला आठवण येते. 'शिक्षणाचे माध्यम मातृभाषाच असली पाहिजे, असे म्हणणाऱ्या आम्हा मंडळींना अनेक जण तुम्ही या बाबतीत भावनाविवश होता म्हणून असे म्हणता असे सांगतात. वस्तुनिष्ठतेने तुम्ही विचार केला तर इंग्रजी ही भाषा मराठीपेक्षा पुष्कळ समृद्ध आहे व अनेक प्रगत राष्ट्रात त्याचा वापर केला जातो म्हणून आपणही तेच माध्यम ठेवले तर विज्ञानाच्या आश्चर्यकारक प्रगतीच्या या जमान्यात आपला टिकाव लागेल.' परंतु माध्यम मातृभाषा पाहिजे याचा अर्थ ती आज इंग्रजीइतकी समृद्ध आहे असा नसून आपण आधुनिक ज्ञान देताना व घेताना तिचा उपयोग करून तिला अधिक समृद्ध करावयास हवे व मातृभाषा माध्यम म्हणून वापरली तर विषयाचे अधिक चांगले अध्ययन होते व एक प्रगत भाषा म्हणून इंग्रजीचा अभ्यास आवश्यक व आवडीने करावा असे याचे प्रत्युत्तर आहे. माझी पत्नी, माझी आई, माझे मूल, माझी मातृभाषा ही ज्या अर्थी माझी, त्याच अर्थी हिंदु धर्म माझा होय असे गांधी म्हणत. व त्यात आलेल्या दोषांच्या म्हणजेच मुख्यतः जातिभेदाने व अस्पृश्यतेमुळे आलेली विषमता व अन्याय व मोक्ष किंवा पारलौकिक सुख वगैरेवरील विश्वासामुळे आपल्यापुढे असलेल्या जगापुढे ऐहिक जीवनाकडे दुर्लक्ष करण्याची प्रवृत्ती या हिंदु धर्मातील दोषांवर गांधींनी केले इतके कठोर प्रहार दुसरे कुणीही केले नसतील. ते स्वतः आपल्या रोजच्या प्रार्थनेत सर्व धर्मीयांचे धर्मग्रंथातील विचारांचा उपयोग करीत; व जाती व धर्म यांतील भेदांमुळे ते कुणालाही दूरचा समजत नसत, किंवा खालचा समजत नसत. उलट त्याला ते अधिक जवळ करीत, याबद्दल तर अनेक हिंदूंचा त्यांच्यावर रोष होता. गांधींची हिंदूधर्मविषयकची कल्पना विवेकानंदाच्या हिंदुधर्माप्रमाणे किंवा वेदान्ताप्रमाणे सर्व संग्राहक अशी होती. विवेकानंद म्हणत की जे हिंदु नसतील, वेदान्ती नसतील त्यांना मी एवढेच सांगेन की तुम्ही आपल्या धर्माचे व तत्त्वज्ञानांतील भूमिकेचे प्रामाणिकपणे आचरण करा, समर्थन करा म्हणजे तुम्ही हिंदूच आहात व वेदान्ती आहात असे मी समजतो. पुणे येथील आंतरधर्मीय मंडळामध्ये झालेल्या एका चर्चेची मला येथे आठवण येते. चर्चेत येथील डी नोबीली कॉलेज मधील एका न्यू पदव्युत्तर शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्याने मला असे विचारले की, माझ्या मते 'ख्रिस्तीधर्म व ख्रिस्तावर संपूर्ण विश्वास ठेवणाऱ्याचेच खरे कल्याण होते' व हे दुसऱ्यास सांगून त्यांचेही कल्याण करण्याचे हे माझे कर्तव्य नाही का? मी त्याला उत्तर दिले की कोणच्याही व्यावहारिक कारणाकरिता म्हणजे लोभ किंवा भीती यांचा उपयोग न करता तूं जर इतर धर्मीयांना तुला काय वाटते, तुझी श्रद्धा काय आहे ते सांगितलेस तर त्यात तुझा दोष नाही. एका अर्थी तुझे ते कर्तव्यच आहे परंतु मग एक हिंदू म्हणून मी जर तुला असे उत्तर दिले की "मी चांगला हिंदु आहे याचा अर्थच मी चांगला ख्रिश्चनही आहे, चांगला इस्लामीही आहे. थोडक्यात म्हणजे सर्व धर्माचे मुख्य व ग्राह्य मुद्दे मला मान्य आहेत असा होतो म्हणून प्रत्यक्ष ख्रिस्ती मी न झालो तरी चांगला हिंदू असल्यामुळे व असण्याकरिता व असण्यातच चांगला ख्रिश्चनही मी असतोच. तर हे उत्तरही तू खुषीने स्वीकारले पाहिजेस". प्रा. पटेल यांच्या भूमिकेत आणखी दोन अडचणी आहेत. पहिली अशी की सर्व धर्मातील श्रेष्ठ तत्त्वे घेऊन एक नवा कृत्रिम धर्म

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्रस्थापित केला तर त्याला परंपरेचे सामर्थ्य रहाणार नाही व तो निष्क्रिय व निर्जीव राहील. दुसरी अडचण अशी की कोठचा तरी धर्म हा हवाच हे प्रा. पटेल यात गृहीत धरतात, पण तेही विवादच आहे. कारण ' सेक्यूलॅरिझम ' किंवा इहवाद हाच बुद्धिमार्गी असणाऱ्या व्यक्तींना मान्य असतो. व धर्मकल्पना ही खुळचटपणाची आहे व काही स्वार्थी लोकांनी सत्ता व महत्व आपल्याकडे रहावे म्हणून ती पसरवली आहे असे ते म्हणतात. माझ्या मते या आक्षेपाला दोन प्रकारची उत्तरे आहेत : एक म्हणजे प्रत्यक्ष अनुभव पहाता सामाजिक सुधारणा अन्याय व विषमता दूर करणे इत्यादी ज्या गोष्टी इहवादी योग्य म्हणून स्वीकारतात ते कार्यही त्यांचेपेक्षा आपणास धर्मनिष्ठ व्यक्तींकडून अधिक झाले आहे. याचे उत्तम उदाहरण म्हणजे स्वतः गांधीच होत. अस्पृश्यता निवारण, स्त्रियांना पुरुषांचे बरोबरीला आणून त्यांचे स्वातंत्र्य मिळवून देणे. हिंदु, मुस्लिम नागरिकांत बंधुत्वाची भावना निर्माण करणे या गोष्टी गांधींनी जितक्या केल्या तितक्या अद्याप दुसऱ्या कोणा भारतीयाकडून झाल्या नाहीत. याशिवाय दुसरे उत्तर असे की ' सेक्यूलॅरिस्ट ' समजतात त्याप्रमाणे पूर्वजन्म, स्वर्ग, नरक, निरनिराळे पूजेचे प्रकार यात धर्माचे अंतरंग नसते. इहवादी म्हणतात तीच सर्व मूल्ये व प्रगतिपर मते एके ठिकाणी व्यवस्थित संकलित करणे व निसर्ग व मानव यांचे सहकार्याचे महत्त्व समजणे म्हणजे धर्म अशी खरोखर स्थिती आहे व खऱ्या धर्मनिष्ठांचे जीवन हेच दाखविते. स्वतः गांधींनी असे उत्तर दिले नसते. धर्म ईश्वराचे अस्तित्त्व ही माझी श्रद्धा आहे असे ते म्हणते. परंतु ते जे जीवन जगले, ज्या सुधारणा घडवून आणण्याचे त्यांनी सतत प्रयत्न केले व शेवटी ज्या मूल्यांकरिता अनेक कष्ट केले, प्राणार्पण केले याचा आपण विचार केला तर त्यांची भूमिका हीच होती हे पटते.


कोयना सिमेंट वस्तुनिर्मिती सहकारी संस्था लिमिटेड, कराड

६२ शिवाजीनगर, हौसिंग सोसायटी, कराड ( जि. सातारा )

❋ आमची उत्पादने ❋

१ ) ४" व्यासापासून ४८" व्यासापर्यंतचे प्रेशर नॉनप्रेशर पाइप्स.
२ ) सेप्टिक टँक्स व वॉटर टँक्स.
३ ) व्ही टाईप गटर्स, हाफ राउंडस् व कंपौंड पोल्स.
४ ) काँक्रीटचे हॉलोब्लॉक्स, दरवाजा फ्रेम, खिडकी फ्रेम छावण्या, तुळया व इतर सामान.
५ ) मजबूत, टिकाऊ, गुणवत्तेत सरस माल माफक दरात मिळेल.
६ ) लिफ्ट इरिगेशन स्किम्स सर्व्हे करून पूर्ण करून देण्याची खास सोय.
७ ) पूर्वरचित घरांचे सुटे भाग, तसेच स्वस्तात घरे बांधून देण्याची सोय.

—: पत्रव्यवहाराचा पत्ता :—

६२ शिवाजीनगर, कराड ( जि. सातारा ) फोन नं. ५२०, ७५४

शा. ग. पवार
मॅनेजिंग डायरेक्टर

रा. श्री. कोटणीस
चेअरमन




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

जॉन पासमोर अनु० मे. पुं रेगे

# निसर्गाविषयीच्या वृत्ती :

[ माणसाच्या नैसर्गिक परिसराचे होणारे प्रदूषण, 'जीवनमान' सुधारण्यासाठी नैसर्गिक साधनसामग्रीची होणारी बेदरकार उधळपट्टी, परिसराचा होणारा संहार ह्या आजच्या काळातील काही प्रमुख समस्या आहेत. ह्या समस्यांना समर्थपणे तोंड देण्यासाठी एक नवीन निसर्गविषयक तत्त्वज्ञानाची आणि नीतिशास्त्राची आवश्यकता आहे असे मत अनेकदा व्यक्त होताना आढळते. ह्या संदर्भात पाश्चात्त्य तत्त्वज्ञानाच्या आणि नीतिशास्त्राच्या परंपरेचे प्रा. जॉन पासमोर ह्यांनी केलेले विश्लेषण उद्‌बोधक ठरावे –का. सं. ]

'निसर्ग' ह्या शब्दाचा अर्थ अनिश्चित आणि संदिग्ध आहे. पण ह्या निबंधात 'निसर्ग' हा शब्द एका काहीशा संकुचित पण नेमक्या अर्थाने वापरण्यात येईल. माणसे आणि माणसांनी निर्मिलेल्या वस्तू वगळून उरलेले विश्व म्हणजे निसर्ग. ( अर्थात् ज्यांना आपण निसर्गातील पदार्थ किंवा अस्तित्वे मानू– उदा., ईश्वर– ती अस्तित्वात असतीलच, तर तीही निसर्गातून वगळली जातील. ) उदा., ताजमहाल किंवा शहाजहान हे निसर्गाचे भाग म्हणून निसर्गात अंतर्भूत असणार नाहीत. ह्या अर्थाने निसर्ग घेतला, तर त्याच्याविषयी पाश्चात्य समाजात कोणती वृत्ती होती आणि कोणती वृत्ती असणे योग्य होते, ह्या प्रश्नांचा आपल्याला विचार करायचा आहे. विशेषतः निसर्गाच्या ज्या भागात बदल घडवून आणण्याची कुवत माणसांना असते त्याच्याविषयीच्या आणि कार्ल बार्थने ज्याचे 'आपल्या भोवती असलेले पशूंचे आणि वनस्पतींचे विचित्र जीवन' असे वर्णन केले आहे त्याच्याविषयीच्या रूढ वृत्तींचा परामर्ष आपल्याला घ्यायचा आहे. हे जीवन आपल्या कृतींनी नष्ट करणे आपल्याला शक्य असते.

पशूंचे आणि वनस्पतींचे जीवन कोणत्या बाबतीत 'विचित्र' असते ? माणसांच्या इतर माणसांविषयींच्या वृत्तीतही अनेक भेद असतात, ह्या वृत्तीही खूप गुंतागुंतीच्या असतात. इतर माणसे हे आपले सजातीय बांधव खरे पण त्यांची वागण्याची तऱ्हा आपल्या दृष्टीने अनेकदा विचित्र असते. पण माणसांना वळणावर आणण्यासाठी त्यांच्याशी व्यवहार करण्याच्या अनेक पद्धती असतात. ह्या पद्धती निसर्गाशी आपली गाठ पडते तेव्हा कामी येत नाहीत. माणसांशी आपण युक्तिवाद करू शकतो, त्यांचा प्रतिवाद करू शकतो, आपले गाऱ्हाणे त्यांच्यापुढे मांडून किंवा त्यांची विनवणी करून त्यांनी आपले मार्ग बदलावे यासाठी प्रयत्न करू शकतो. आता कित्येक माणसांच्या बाबतीत असे करता येत नाही हे खरे आहे; ठार वेडी झालेल्या माणसांच्या बाबतीत असे करता येत नाही. पण ह्याच कारणामुळे अशा माणसांना मानवसमाजामधून वगळण्याकडे आपली प्रवृत्ती असते. कित्येक समाजात अशा माणसांच्या ठिकाणी काही दैवी, अमानुष शक्ती असते असे मानण्यात येते. कित्येकांत त्यांना केवळ पशू म्हणून वागविण्यात येते. बेड्‌लॅमच्या प्रसिद्ध वेड्यांच्या इस्पितळाला, एखाद्या पशुसंग्रहालयाला भेट द्यावी, तशी भेट अनेकजण देत. आपल्या युक्तिवादांच्या आणि विनवणीच्या पलीकडे असलेल्या वेड्या माणसांविषयी आपल्याला एक विचित्र भीती वाटते. माणसाने बनविलेल्या, कृत्रिम वस्तू घेतल्या तर माणसांना आपण ज्या प्रकारे वळवू शकतो त्या

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

मार्गांनी त्यांना वळविता येत नाही हे मान्यच आहे; एखाद्या इमारतीला, आपल्या मार्गातून दूर सर, अशी विनवणी करण्यात अर्थ नसतो हे उघड आहे. पण एका प्रकारच्या मानवी व्यवहारात एक विशिष्ट भाग घेण्यासाठी म्हणून त्यांना घडविलेले असते अशी ह्या वस्तूंची ओळख आपल्याला पटत असते आणि ह्या मानवी व्यवहाराला आपल्याला वळविता येणे तत्त्वतः शक्य असते; ह्या वस्तूंतून त्यांना घडविणारे मानवी कारागीर आपल्याला दिसू शकतात. पण जेव्हा ते असे दिसत नाहीत, जेव्हा आपल्याला एखादी अशी वस्तू आढळून येते की ती कृत्रिम आहे हे स्पष्ट असते पण कोणत्या प्रकारच्या मानवी जीवनात तिचे काय कार्य असेल ह्याचा तर्क करता येत नाही तेव्हा ती आपल्याला विचित्र, लोकविलक्षण, अद्‌भुत भासते. उदा. स्टोनहेंगे.

कार्ल बार्थ ह्यांनी ज्या अर्थाने 'विचित्र' हा शब्द वापरला आहे त्या अर्थाने जे विचित्र असते ते केवळ अपरिचित नसते तर ते परकेसुद्धा असते. (अशिक्षित लोकांना कुठलाही परदेशी माणूस विचित्र वाटतो कारण त्यांना त्याच्याशी संभाषण करता येत नाही त्याला काही कृती करायला लावायचे झाले तर त्याला ते करायला सांगण्याने भागत नाही; एखाद्या नैसर्गिक वस्तूला आपण ढकलतो तसे त्याला ढकलावे लागते.) आता निसर्ग ह्या अर्थाने परका असतो हे माणसांनी नेहमीच ओळखलेले आहे असे नाही. मानवजातीचा संबंध इतिहास आपण घेतला तर त्यातील बऱ्याच कालखंडात नैसर्गिक प्रक्रियांना उद्दिष्टे असतात, प्रार्थना, विनवणी करून माणसांना जसे आपण वळवू शकतो अगदी तसेच नैसर्गिक प्रक्रियांनाही वळवू शकतो, एखाद्या कल्पित मानवसदृश देवाच्या मध्यस्तीने नव्हे तर साक्षात् ह्या प्रक्रियांनाच आपण वळवू शकतो असे माणसे मानताना आढळून येतात.

पण गेल्या दोन हजार वर्षांत ग्रीक-ख्रिश्चन परंपरेतील पाश्चात्य समाजाने निसर्गाविषयीच्या ह्या संकल्पनेचा पूर्णपणे अव्हेर केला आहे. निदान त्याचे जे अधिकृत विज्ञान, तंत्रज्ञान आणि तत्त्वज्ञान आहे त्याच्यात ह्या संकल्पनेचा अव्हेर केलेला आढळतो. सर्वसाधारण खेडूत घेतला तर नैसर्गिक प्रक्रिया, घटना ह्यांना उद्दिष्टे नसतात, अगदी अचेतन पदार्थांत घडणाऱ्या प्रक्रियांनाही उद्दिष्टे नसतात अशी त्याची खात्री पटवून देणे सोपे नव्हते. एकोणिसाव्या शतकाइतक्या अलिकडे जर्मन अरण्यात राहणाऱ्या माणसांना, एखादे झाड तोडायला घेण्यापूर्वी ते तोडणे का आवश्यक होते ह्याचे स्पष्टीकरण त्या झाडापाशी करण्यात सूज्ञपणा आहे हे उघड दिसत होते. इब्सेनच्या 'जंगली बदक' ह्या नाटकात म्हाताऱ्या एकडालची बेदरकारपणे झाडे तोडून विरळ करण्यात आलेले अरण्य 'सूड' घेऊ पाहील अशी खात्री होती; ब्यूख्नेरच्या 'व्हायझेक'मध्ये एक माणूस नदीत बुडून मेल्याची घटना का घडली ह्याचा आपल्या सोबत्याशी उलगडा करताना, 'ही नदी गेला बराच काळ बळी शोधीत होती' असे स्पष्टीकरण गावचा रहिवासी करतो. (वर्तमानपत्रात बातम्यांना देण्यात येणाऱ्या मथळ्यातूनसुद्धा ही उपमा आपल्याला परिचित झालेली असते: एखादा धोकेबाज समुद्रकिनारा 'आणखी एक बळी' घेतो.)

निसर्गाकडे पाहण्याची ही दृष्टी अजून काही प्रमाणात प्रभावी आहे असे मला वाटते. परिविज्ञानावरील (ecology) अलिकडच्या काही लिखाणात, मानवजातीने जी दुष्कृत्ये केली आहेत त्यांचा निसर्ग 'सूड उगविल्याशिवाय राहणार नाही' असे मत मांडलेले आढळते आणि हे मत ज्या अभिनिवेशाने मांडण्यात येते त्यावरून पाहता ह्या संदर्भात 'सूड' हा शब्द केवळ लाक्षणिक अर्थाने वापरण्यात येत आहे असे वाटत नाही. परिसर अशुद्ध होणे, दूषित होणे, म्हणजे विटाळला जाणे, पावित्र्याचा भंग करणे, मानवाने आपली मर्यादा सोडणे ह्या संकल्पना अशा लिखाणात अजून प्रभावशाली असलेल्या आढळतात.

पण स्टोइक-ख्रिश्चन परंपरेप्रमाणे पाहता माणसाचे स्वरूप, माणसाचे विश्वातील स्थान केवळ अनन्यसाधारण आहे. माणसाच्या अनन्यसाधारणत्वावर ह्या परंपरेने भर दिला आहे. ख्रिश्चन धर्माप्रमाणे पाहता, कार्ल बार्थच्या शब्दांत, ईश्वराने केवळ माणसाला 'उद्देशून भाषण' केले आहे आणि म्हणून केवळ माणूस तारला जातो किंवा शापित ठरतो ह्या वस्तुस्थितीतून माणसाचे हे अनन्यसाधारणत्व विशेष स्पष्टपणे दिसून


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

येते. पण स्टोइक–ख्रिश्चन ही सबंध परंपरा घेतली तर तिच्या दृष्टीने केवळ माणूस इतरांशी विवेकशील संभाषण करू शकतो, माणसे परस्परांशी विवेकशील नाती जोडू शकतात ह्याच्यातही हे अनन्यसाधारणत्व सामावलेले असते. ह्या दृष्टिकोनातून पाहता निसर्ग जर पूर्णपणे विचित्र परका नसेल तर ईश्वराने माणसांच्या उपयोगासाठी निसर्ग निर्माण केलेला आहे हेच काय ते त्याचे कारण असू शकेल. तेव्हा कित्येक बाबतीत तरी प्राणी आणि वनस्पती ह्यांचा हत्यारांच्या: अवजारांच्या वर्गात समावेश करता येईल. पशू मूक असले तरी ते माणसांच्या इच्छांचे आज्ञाधारकपणे पालन करू शकतात. हा पारंपरिक दृष्टिकोन पीटर लांबार्डने आपल्या 'वचनांत' असा मांडला आहे: 'माणसाला ज्याप्रमाणे ईश्वराप्रीत्यर्थ, म्हणजे त्याने ईश्वराची सेवा करावी म्हणून निर्माण करण्यात आले आहे त्याप्रमाणे जग माणसाप्रीत्यर्थ, माणसाच्या सेवेसाठी निर्माण करण्यात आले आहे." निसर्ग विवेकशील नसतो आणि त्याअर्थी तो परका असतो हे जरी खरे असले तरी मूळ ख्रिश्चन मताप्रमाणे तो कितीही माणसाच्या विरोधी किंवा माणसाविषयी उदासीन असल्यासारखा भासला तरी तो खरोखर तसा नसतो. कोणत्याही नैसर्गिक प्रक्रियेचे अस्तित्व माणसांना त्यांच्या भौतिक जीवनात साहाय्य व्हावे ह्यासाठी तरी असते किंवा त्यांना आध्यात्मिक मार्गदर्शन लाभावे ह्यासाठी तरी असते. उदा. जलप्रलय, ज्वालामुखीचे उद्रेक किंवा झंझावाती वादळे यांच्यामुळे माणसांना त्यांच्या भ्रष्ट स्थितीचे स्मरण करून दिले जाते.

पाश्चात्य संस्कृतीचे जे परिविज्ञानवादी (ecologist) टीकाकार आहेत त्यांना ह्या मताचे मूळ जुन्या करारात आढळते आणि ह्या संस्कृतीची सारी विनाशकता ह्या मतापासून निष्पन्न होते, तिचे मूळ ह्या मतात आहे असे ते मानतात. पण ही दुहेरी चूक आहे. एकतर, जे आहे ते सारे माणसाच्या सेवेसाठी आहे ही निश्चितपणे जुन्या कराराची नेहमीची शिकवण नाही. जॉबच्या अध्यायातील शब्दात 'ईश्वर जेथे कुणी माणूस नाही तेथेही पाऊस पाडतो; वैराण, पडिक जमिनीला शांत करायला, नाजुक कोवळ्या वनस्पतींना धुमारे फुटावे म्हणून तो पाऊस पाडतो.' पॉलने 'ईश्वराला बैलांची काळजी असते का?' असा जो प्रश्न विचारला आहे त्याचे जुन्या करारातील कुणाही ज्यूने 'अर्थात् असते' असेच उत्तर दिले असते. जुन्या कराराची ही स्थायी शिकवण आहे. विरुद्ध मत स्वीकारले ते स्टोइक तत्त्ववेत्त्यांनी. ऑरिगेन-सारख्या ख्रिश्चन विचारवंतांनी अनुयायित्व केले आहे ते ह्या स्टोइक तत्त्ववेत्त्यांचे आणि ही शिकवण जुन्या करारात आढळते ह्या सबबीखाली ते केले आहे. दुसरी गोष्ट अशी की 'सर्व काही माणसासाठी निर्माण करण्यात आले आहे' ह्या सिद्धांतापासून माणसाने निघावे आणि जग बदलायला सुरवात करावी असे तात्काल निष्पन्न होत नाही. उलट शेकडो वर्षे ह्या सिद्धांताचा अर्थ निसर्गाची आहे ती घडी तशीच राहू द्यावी असाच घेण्यात येत होता. माणसाला कशाची जरूरी असते हे ईश्वरालाच सर्वात चांगले कळते. ईश्वराने जे निर्माण केले आहे त्याचा आकार बदलून त्याला वेगळा आकार देणे औद्धत्याचे ठरेल; माणसाने आपली मर्यादा सोडल्या-सारखे ते होईल. पापी, भ्रष्ट माणसांनी जगाचा आकार बदलून त्याच्यावर आपली छाप मारणे अयोग्य आहे.

धर्मयुद्धानंतर युरोपमध्ये 'यांत्रिक कलां'चा विकास झाला; रहाट, पवनचक्की, होकायंत्र, घड्याळे बनविण्यात येऊ लागली. पण ह्या साऱ्या निर्मिती सैतानी आहेत म्हणून त्यांचा अनेकजणांनी धिक्कार केला. प्रसिद्ध तत्त्ववेत्ता हायडेग्गर प्रचलित शब्दांची काहीशी विचित्र व्युत्पत्ती देऊन त्यांच्यांतून विलक्षण अर्थ काढतात हे परिचित आहे. ह्या प्रकारच्या एका व्युत्पत्तीचे उत्कृष्ट उदाहरण ह्या कालखंडात आढळते. 'मेकॅनिकल (यांत्रिक) कला' 'मेकॅनिकल' हा शब्द 'मेका' (Moecha) ह्या शब्दापासून बनला आहे अशीही व्युत्पत्ती देण्यात आली होती. मेका ही एक व्यभिचारिणी स्त्री होती. तेव्हा हा युक्तिवाद असा होता की माणसांनी ज्याची इच्छा धरणे योग्य असते ते सर्व ईश्वराने त्याला पृथ्वीवर आयते उपलब्ध करून दिलेले आहे. माणसाला जे श्रम करावे लागतात ते कमी कष्टप्रद व्हावेत अशी इच्छा धरणे म्हणजे सरळ ईश्वराच्या संकल्पाविरुद्ध जाणे होय; जणू काही ॲडमने कधीच



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

पाप केले नव्हते अशा स्वरूपात जगाची पुनर्रचना करण्याचा तो प्रयत्न ठरतो.

पण परिविज्ञानवाद्यांनी पाश्चात्य संस्कृतीचे जे निदान केले आहे त्याच्यात सत्याचा अंश आहेच. जे आहे ते माणसाच्या सेवेसाठी आहे ह्या मतामुळे निसर्गाकडे पाहण्याच्या एका विशिष्ट दृष्टिकोनाचा विकास व्हायला उत्तेजन लाभले. निसर्गाचा आदर करायचे कारण नाही, त्याचा उपयोग करून घेतला पाहिजे असा हा दृष्टिकोन आहे. निसर्ग कोणत्याही अर्थाने पवित्र नाही; ह्या मुद्यावर ख्रिश्चन धर्म-शास्त्र आणि ग्रीक विश्वरचनाशास्त्र (कॉस्मॉलॉजि) ह्यांचे एकमत होते. अर्थात् ईश्वर विशिष्ट स्थळे आणि वस्तू ह्यांची त्यांच्यांत वसण्यासाठी म्हणून निवड करून त्यांना पावित्र्य देऊ शकतो; मास ह्या रोमन कॅथलिक विधीतील भाकर आणि मद्य यांना त्याने अशा रीतीने पवित्र केलेले असते. पण कोणतीही नैसर्गिक वस्तू, एक नैसर्गिक वस्तू म्हणून पवित्र नसते; एखादे झाड तोडण्याने किंवा एखाद्या पशूची हत्या करण्याने पावित्र्यभंग होत नाही. बेकनने जेव्हा निसर्गाचे रूपांतर करण्याचा आदर्श पुढे मांडला, – किंवा अधिक बिनचूकपणे बोलायचे तर 'इडनच्या बागे'ची पुनर्निर्मिती करण्याचा आदर्श पुढे मांडला – तेव्हा माणूस इतका भ्रष्ट आहे की तो ह्या स्वरूपाची कामगिरी हाती घेऊ शकणार नाही ह्या मताविरुद्ध त्याला झगडावे लागले; निसर्ग इतका पवित्र आहे की त्याला स्पर्श करणे योग्य ठरणार नाही ह्या मताविरुद्ध त्याला झगडावे लागले नाही. ईश्वराने आपली प्रतिकृती म्हणून माणसाला निर्माण केले आहे, निसर्गाला नव्हे हा मुद्दा बेकनच्या बाजूचा होता.

तेव्हा ख्रिश्चन धर्माचे समर्थक विज्ञान आणि तंत्रज्ञान ही ख्रिश्चन संस्कृतीची विशिष्ट निर्मिती आहे असे जेव्हा म्हणतात तेव्हा ह्या मर्यादेत त्यांचे म्हणणे सत्य असते; निसर्गाचे विश्लेषण करण्यात किंवा त्याच्यात बदल करण्यात कोणताही पावित्र्य-भंग होत नाही असे ख्रिश्चन धर्माने माणसांना शिकविले. पण ख्रिस्ती धर्माने जेव्हा 'आदिम पापा' वरील आपल्या विश्वासाला मुरड घातली, म्हणजे व्यवहारात जेव्हा त्याने पेलागियन सिद्धांत स्वीकारला तेव्हाच माणसाच्या गरजांना अधिक अनुकूल असा नवीन निसर्ग पृथ्वीवर घडविण्याच्या त्याच्या प्रयत्नांकडे पसंतीच्या दृष्टीने पाहणे त्याला शक्य झाले. नाहीतर अशा प्रयत्नांना उत्तेजन देण्याचे सोडाच पण ते सहन करणेही ख्रिश्चन धर्माला मानविले नसते. लॉकने आदिम पापाच्या संकल्पनेवर जो जोरदार हल्ला चढविला आहे– त्याच्या धर्मविषयक लिखाणात हा हल्ला स्पष्टपणे केलेला आहे आणि 'निबंधा'त तो गर्भित आहे– तो म्हणजे माणसाकडून निसर्गाचे (आणि माणसाचे) परिवर्तन होण्याच्या कामातील अडथळे दूर करण्याची जी कामगिरी त्याने स्वीकारली होती–' गवंडयाच्या हाताखाली काम करणाऱ्या मजुराची कामगिरी' असे जिचे त्याने वर्णन केले आहे– तिचा एक भाग होता.

निसर्गाविषयीची ही जी ख्रिश्चन संकल्पना आहे तिच्याशी एक विशिष्ट नैतिक सिद्धांत संबंधित आहे. हा सिद्धांत असा की माणसाचे नैसर्गिक वस्तूंशी जे संबंध असतात त्यांना कोणतेही नैतिक अंग किंवा संदर्भ असत नाही. ह्याला अपवाद एवढाच की जेव्हा ह्या नैसर्गिक वस्तू इतर कुणाची मालमत्ता असते किंवा नैसर्गिक वस्तूंना क्रूरपणे किंवा त्यांचा नाश होईल अशा रीतीने वागविल्या-मुळे इतर माणसांविषयीही ह्याच स्वरूपाच्या वृत्ती बळावयाला उत्तेजन मिळणे शक्य असते तेव्हा त्यांना असा नैतिक संदर्भ प्राप्त होतो. स्टोइक तत्त्व-वेत्त्यांनी ह्या सिद्धांताचे दृढपणे प्रतिपादन केले होते आणि ऑगस्तिननेही तितक्याच हिरीरीने त्याचे समर्थन केले आहे. ऑगस्तिनने केलेला एक युक्तिवाद असा की येशूने दुष्ट पिशाच्चांना ( डेव्हिल्स ) नष्ट करण्याऐवजी त्यांना डुकरांमध्ये हाकलले– ह्या डुकरांनी कोणताही गुन्हा केला नव्हता– ह्या त्याच्या कृत्यापासून माणसांनी धडा घ्यायचा तो असा की प्राण्यांना कसेही वागविण्याची माणसांना मुभा आहे. प्राण्यांशी केलेले क्रूर कृत्यसुद्धा स्वतःच गैर नसते असे अक्विनासने आपल्याला सांगितले आहे. 'पवित्र बायबलमधील काही वचने आपल्याला पशूशी क्रूरपणे वागायला मना करतात असे दिसत असेल तर... ते एवढ्याचसाठी की प्राण्यांशी क्रूरपणे वागल्याने माणसे माणसांशीही क्रूरपणे तर वागणार



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

नाहीत ना ही आशंका असते किंवा पशूंना अपाय केल्याने माणसांची ऐहिक हानी होते.' दुसऱ्या शब्दांत, पशूंशी केलेल्या क्रौर्यामुळे माणसांवर अनिष्ट परिणाम घडून येऊ शकतील ह्या केवळ कारणामुळे पशूंशी क्रौर्याने वागणे गैर असते. कांट ह्यांच परंपरेतील होता आणि अठराव्या शतकाच्या अखेरच्या दशकांतही त्याने ही भूमिका उचलून धरली आहे. आणि प्राण्यांविषयीच्या क्रौर्याच्या बाबतीत जे सत्य आहे ते ह्या मताप्रमाणे मानवेतर निसर्गाच्या इतर घटकांच्या संबंधात आपले जे व्यवहार होतात, त्यांना लागू पडते ही गोष्ट अधिकच स्पष्ट आहे. फक्त ज्यूइश तत्त्वज्ञानात आणि ह्या तत्त्वज्ञानापासून स्फूर्ती घेतलेल्या विचारांत काय तो विरुद्ध दृष्टिकोण प्रचलित असलेला आढळतो. ताल्मुडमध्ये अनेक ठिकाणी निसर्गाविषयीच्या अधिक आस्तेवाईक वृत्तीचा पुरस्कार केलेला आढळतो. कांटने पारंपरिक भूमिकेचा जो पुनरुच्चार केलेला आहे तो बाउमगार्टनला विरोध करताना केलेला आहे आणि बाउमगार्टनने ह्या बाबतीत ताल्मुडचा अनुवाद केला होता.

प्राण्यांशी क्रौर्याने वागण्याचे कृत्य स्वरूपतःच किंवा आंतरिकतःच गैर असते का हा प्रश्न प्रथमदर्शनी वाटेल त्यापेक्षा कितीतरी अधिक महत्त्वाचा आहे. आणि ह्या कारणामुळे कांटसारखे तत्त्ववेत्ते प्राण्यासंबंधीच्या क्रौर्यामुळे माणसांशी क्रौर्याने वागायला उत्तेजन मिळते ह्या अनुभवाधिष्ठित गृहीतकामुळेच ( हायपॉथिसिस ) केवळ प्राण्यांविषयीचे क्रौर्य गैर ठरते असा आग्रह धरीत, हे तत्त्ववेत्ते स्वतः सहृदय, दयाळू वृत्तीचे होते यात शंका नाही, आणि हे गृहीतक संशयास्पदच आहे. पण असा आग्रह त्यांनी धरण्याचे कारण असे की, प्राण्यांशी केलेले क्रौर्याचे वर्तन स्वरूपतः गैर असते असे असेल तर मग माणसे निसर्गाशी कसे वर्तन करतात ह्याला काही नैतिक अंग, संदर्भ नसतो हे टिकू शकत नाही. एका बाबतीत तरी माणसांच्या निसर्गाशी होणाऱ्या वर्तनाचे नैतिक दृष्टीने नियमन करणे योग्य ठरते; आणि ही नैतिक दृष्टी केवळ माणसांचे हितसंबंध ध्यानात घेणारी नसते. निसर्गाशी योग्य रीतीने वागण्याचे कर्तव्य हे व्यक्तीच्या इतर माणसांविषयींच्या कर्तव्याहून किंवा कांट मानीत होता तशा व्यक्तीच्या स्वतःविषयीच्या कर्तव्यांहून वेगळे असलेले असे कर्तव्य असते. आणि निसर्गाविषयी व्यवहार करताना माणसांना एका बाबतीत जर अशी कर्तव्ये असतील तर त्यांना इतर बाबतीतही अशी कर्तव्ये असू शकतील.

प्राण्यांना निष्कारण दुःख देणे गैर असते हे अमान्य करण्याचा एक सरळ आणि निर्णायक मार्ग असा की प्राण्यांना दुःख होऊ शकते ही गोष्ट मुळातच नाकारणे. देकार्तने हे पाऊल उचलले. ग्रीक-ख्रिश्चन परंपरेमध्ये माणूस आणि इतर प्राणी यांच्यात भेद करण्याची जी प्रवृत्ती आढळते तिची काही बाबतीत परिणती देकार्तच्या तत्त्वज्ञानात झाली. कारण प्राण्यांना संवेदन असते हीच गोष्ट देकार्त नाकारतो, मग त्यांनी बुद्धीचा वापर करणे दूर राहिले. ( सिसिरोचे असे एक वचन आहे की कितीही आचरट असा एखादा सिद्धांत घ्या; कुणी ना कुणीतरी तत्त्ववेत्त्याने तो स्वीकारलेला असतोच.' देकार्तनेही ह्या वचनाचा अनुवाद केला आहे. पण देकार्तच्या वरील मताच्या संदर्भात ह्या वचनाची आठवण अटळपणे होते. ) मालब्रांश हा देकार्तचा अनुयायी. त्याचे म्हणणे असे की सर्वच दुःख हे ॲडमच्या पापातून उद्भवले; प्राणी ह्या पापात सहभागी नसल्यामुळे त्यांना दुःख भोगावे लागत नाही; त्यांना दुःख होऊच शकत नाही. आपल्या कृत्यांचा परिणाम म्हणून खरोखर पाहता प्राण्यांना दुःख सहन करावे लागत नाही; पण जणू काही त्यांना दुःख सहन करावे लागत आहे अशारीतीने ते वागतात- काही स्टोइक तत्त्ववेत्त्यांनाही ह्या सिद्धांतावर विश्वास ठेवणे जमले होते. तेव्हा प्राण्यांबरोबर आपण युक्तिवाद करू शकतो असे मानणे तर चूक आहेच पण त्यांच्याविषयी आपल्याला सहानुभूती बाळगता येते असे मानणेही चूक ठरते. आता ही गोष्ट खरी की ह्या निर्णयापर्यंत पोचण्यासाठी देकार्तला एक किंमत द्यावी लागली होती. ती अशी की मानवी शरीर हा निसर्गाचाच भाग आहे आणि म्हणून त्याच्या ठिकाणी काही पावित्र्य नसते असे त्याला मानावे लागले होते. ह्या मताप्रमाणे निसर्गाबाहेर अशी एकच गोष्ट राहते आणि ती म्हणजे जाणीव. तरीही देकार्तच्या मताप्रमाणे केवळ मानवी शरीरच कोण-




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे
संगणकीकृत


नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

त्यातरी अर्थाने जाणिवेशी संपृक्त असते, कोणत्यातरी अर्थाने मानवी शरीर आणि आत्मा ह्यांचे एकीकरण झालेले असते. ( इतर कुणाही प्राण्यांचे शरीर आत्म्याशी संबंधित नसते, इतर कुणाही प्राण्याला आत्मा नसतो. ) मानवी व्यक्तीमध्ये मन आणि शरीर एकवटलेली असतात आणि म्हणून मानवी व्यक्ती आणि तिच्यापुढे ठाकलेले मानवेतर जग ह्यांच्यामध्ये संपूर्ण विरोध आहे असे कल्पिता येते.

तेव्हा माणसे निसर्गाशी जो व्यवहार करतात त्यांच्यावर कोणत्याही प्रकारचे नैतिक अंकुश असत नाहीत ह्या मताचे देकार्तप्रणीत द्वैतवादाच्या आधारे समर्थन करता येणे शक्य आहे आणि तसे करण्यात आलेही. पण ह्याबरोबरच ह्या सिद्धांताचा 'सर्वकाही माणसाच्या सेवेसाठी घडविण्यात आले आहे' ह्या मताशी जो ऐतिहासिक दुवा होता तो देकार्तने तोडला. हे मत 'बालिश आणि आचरट' आहे असा त्याचा अभिप्राय होता. 'कुणाही माणसाला ज्यांचे कधीही दर्शन किंवा आकलन झालेले नाही आणि कुणाही माणसाला ज्यांचा कधीही काहीही उपयोग नव्हता अशा अनंत वस्तू जगात आहेत आणि होत्या' हे उघड आहे असे त्याचे म्हणणे होते. निसर्गात जे आढळते त्याचा माणसाला उपयोग करून घेता येतो यात काही शंका नाही आणि असा उपयोग त्याने करणे योग्यही आहे. पण माणसाच्या उपयोगासाठी म्हणून निसर्ग आयता निर्माण करून ठेवलेला आहे असे नाही. निसर्गाचा परिणामकारक रीतीने वापर करण्यासाठी त्याच्यात प्रथम परिवर्तन घडवून आणावे लागते. तेव्हा 'निसर्गाचा स्वामी आणि धनी बनणे हे माणसापुढील काम आहे' अशी घोषणा देकार्त करतो ह्याच्यात नवल वाटायचे कारण नाही; निसर्गात जे आहे त्याचा आपण लाभ उठवला पाहिजे अशीच निसर्गविषयी वृत्ती धारण करणे त्याच्या मते योग्य आहे. देकार्तने भौतिक द्रव्याचे प्रातिनिधिक उदाहरण म्हणून मेणाच्या तुकड्याचा निर्देश केला होता; आणि मेणाचा तुकडा म्हणजे जिला आपण मनासारखा कसाही आकार देऊ शकतो अशा वस्तूचे प्रतीक आहे.

निसर्गाचा लाभ उठविण्याची एक पद्धत जशी पूर्वी बेकनने सुचविली होती तशी देकार्तनेही सुचविली आहे. हिला तो 'व्यावहारिक तत्त्वज्ञान' म्हणतो; आपण तिला विज्ञानाधिष्ठित तंत्रज्ञान म्हणू. ह्याच्यामागचे गृहीतकृत्य असे की नैसर्गिक प्रक्रिया जर कशामुळे कमी 'परक्या' बनत असतील तर त्यांना आपल्या विवेकशक्तीत अंतर्भूत असलेल्या किंवा तिने निर्माण केलेल्या संकल्पनांखाली आणल्यानेच त्या तशा बनतात आणि ह्या संकल्पनांद्वारे त्यांचे जे आकलन आपल्याला होते त्याचा उपयोग त्यांना मानवी हितसंबंधांशी अधिक सुसंवादी असे रूप प्राप्त करून देण्यासाठी करता येतो. प्राश्चात्य विज्ञानावर निसर्गविषयीच्या ह्याच वृत्तीचे प्रभुत्व आहे; निसर्गनियमांद्वारे निसर्गाचे आकलन करावे आणि तंत्रज्ञानाद्वारे त्याचे परिवर्तन करावे अशी ही भूमिका आहे.

ह्या कार्यक्रमाशी निगडित असे जे विज्ञानाचे तत्त्वज्ञान आहे ते कित्येक महत्त्वाच्या बाबतीत प्लेटोच्या तात्त्विक भूमिकेशी जुळणारे आहे. निसर्गाचे आकलन करणे म्हणजे परमाणू, इलेक्ट्रॉन, लहरींचे क्षेत्र ह्यांसारख्या अमूर्त स्वरूपाच्या प्रक्रिया आणि वस्तू यांच्यामधील फलनात्मक ( fuctional ) संबंधांचे वर्णन करणारी गणिती सूत्रे शोधून काढणे. म्हणजे अनेकदा असे मांडण्यात येते की, जगात आपल्या भोवती दिसणाऱ्या वस्तू, ज्यांच्याशी मुकाबला करण्याचा आपण प्रयत्न करीत असतो त्या वस्तू हा विज्ञानाचा प्रत्यक्ष विषय नसतो; हा विज्ञानाचा काहीसा अप्रत्यक्ष विषय झाला. भौतिकीची पाठ्यपुस्तके नैसर्गिक वस्तूंचा निर्देश आणि वर्णन करतात ते केवळ प्रायोगिक उपकरणांची जोडणी करण्यापूर्वी सिद्ध कशी करायची ह्याचे वर्णन करण्यासाठी असते. एऱ्हवी ज्या पदार्थांचे आणि प्रक्रियांचे वर्णन ती करतात ते परमाणू आणि किरण आणि लहरी यांच्यासारखे अतींद्रिय पदार्थ व प्रक्रिया असतात आणि भौतिकी हे विज्ञानाचे आदर्श स्वरूप होय असेच मानण्यात येते. 'विज्ञान म्हणजे काय ? तर विज्ञान म्हणजे भौतिकी आणि स्टँप्स गोळा करणे !' असे जे रुदरफोर्डने म्हटलेले आहे त्यातून ही वृत्ती अतिशय नेमकेपणे व्यक्त होते. इंग्रजीत ज्याला 'नॅचरल हिस्टरी' म्हणतात — निसर्गाचा, नैसर्गिक पदार्थांचा 'इतिहास' — म्हणजे आपल्या नेहमीच्या परिसरातील नैसर्गिक वस्तू

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आणि प्रक्रिया यांच्यामधील संबंधांचे गुणात्मक वर्णन करण्यात समाधान मानणारे जे संशोधन असते त्याचा हे केवळ 'स्टँप्स गोळा करणे' आहे असे म्हणून रुदरफोर्ड अधिक्षेप करीत आहे. ह्याच्या मागील गृहीतकृत्य असे आहे की ह्या तऱ्हेचे संशोधन, उदा. देवमाशाच्या सबंध जीवन–इतिहासाविषयीचे संशोधन, अगदी कमी प्रतीची बुद्धी असलेला माणूसच काय तो करील. प्लेटोने 'रूपरसगंधस्पर्शांत आनंद घेणारा' असे ज्याचे वर्णन केले आहे असा माणूस उदा. पक्ष्यांच्या उड्डाणांत आनंद घेणारा, ह्या उड्डाणांत अंतर्भूत असणाऱ्या गणिती समस्यांत नव्हे तर प्रत्यक्ष त्या उड्डाणांतच आनंद घेणारा माणूस हा कनिष्ठ प्रतीचा इंद्रियलोलुप असा माणूस असतो.

निसर्गाविषयीची ही जी वृत्ती आहे तिच्यावर टीका करणारे लोकही अर्थात् होते. ब्लेकसारख्या कवींनी तिचा निषेध केला आहे. चित्रकारही नंतर शुद्ध भूमितीच्या आकृतींच्या मोहात सापडले पण हे घडण्यापूर्वी आपल्या भोवतालच्या जगातील रंग-रूपांकडे ते आपले लक्ष वेधीत असत. जॉन रे सारख्या जीवशास्त्रज्ञांनी देकार्तला विरोध करून सजीवांच्या आकारांत जी अनेकविधता आणि भिन्नता आढळते त्यावर भर दिला होता. पण विज्ञानाचा मध्यवर्ती प्रवाह घेतला तर त्याची भूमिका देकार्त–प्लेटोच्या वळणाची होती.

पण देकार्तने जडद्रव्य आणि चैतन्य, निसर्ग आणि जाणीव ह्यांच्यामधील ज्या द्वैतवादाचा पुरस्कार केला तो तत्त्ववेत्त्यांना सामान्यपणे पसंत नव्हता. ह्याला जी कारणे होती ती वैज्ञानिक ह्या भूमिकेवरून आपली कामे पार पाडीत राहणाऱ्या वैज्ञानिकांना समजणे कठीण ठरले आणि आजही कठीण ठरते. तत्त्ववेत्त्यांचा युक्तिवाद असा होता की देकार्तने निसर्ग आणि जाणीव यांची इतकी पूर्ण फारकत केली की त्यांच्यांत परत काही संबंध जुळवून आणणे शक्य राहिले नाही. देकार्तच्या भूमिकेला त्यांची जी प्रतिक्रिया झाली तिच्यातील समान सूत्र असे की वेगवेगळ्या मार्गांनी का होईना, पण देकार्त मान्य करायला तयार होता त्यापेक्षा निसर्ग खूपच अधिक मानवसदृश आहे असे दाखवून देण्याचा प्रयत्न त्यांनी केला. पण असे करताना बऱ्याचदा निसर्गाचे अस्तित्व माणसाच्या अनुभवापासून पूर्णपणे स्वतंत्र असते ही गोष्ट त्यांना नाकारावी लागली; किंवा निसर्गाचे स्वतंत्र अस्तित्व त्यांनी मान्य केलेच तर हा निसर्ग म्हणजे ज्या निसर्गाशी आपल्या नेहमीच्या जीवनात आपली गाठ पडते आणि त्याच्याशी आपले व्यवहार चालतात तो निसर्ग नव्हे तर जिचा आपल्याला कधीही अनुभव येऊ शकणार नाही अशी ती एक स्वरूपवस्तू ( thing-in-itself ) असते असा सिद्धांत त्यांना स्वीकारावा लागला.

बार्क्लेच्या दृष्टीने पाहता निसर्ग म्हणजे दुसरे तिसरे काही नसून चिन्हांची, माणसांना इशारे, सूचना देणाऱ्या चिन्हांची, एक प्रचंड व्यवस्था असते. हेगेल आणि त्याच्यानंतरचा मार्क्स हे वेगळ्या परंपरेतील आहेत आणि त्यांच्या दृष्टीने निसर्ग हा केवळ 'अभावरूप' 'नञात्मक' (negativity) असतो. ह्याचा अर्थ अर्थात् असा नव्हे की निसर्गाला अस्तित्व नसते. पण तो पादाक्रांत करावा, त्याचे मानवीकरण करावे ह्यासाठीच तो केवळ असतो. माणूस निसर्गाला स्वातंत्र्य देऊ करतो, त्याच्या बंधनांपासून त्याला मुक्त करतो; पण हे सारे निसर्गाला मानवी रूप देऊनच माणसाला करता येते. हेगेलने दिलेले उदाहरण द्यायचे तर माणूस जेव्हा वनस्पती किंवा मांस भक्षण करतो तेव्हा तो नैसर्गिक वस्तूंना मानवी रूप देत असतो. म्हणजे देकार्त नंतरचे तत्त्ववेत्ते, ह्या ना त्या मार्गाने, निसर्ग मानवकेंद्रित आहे ह्या सिद्धांताचे मंडन करताना आढळतात. ह्या प्रवृत्तीच्या टोकाच्या उदाहरणांत माणूस जेव्हा निसर्गाचे दर्शन घेत नसतो तेव्हा निसर्गाला मुळी अस्तित्वच नसते हा सिद्धांत स्वीकारलेला आढळतो. म्हणजे देकार्तने मानव-केन्द्रवादी भूमिकेविरुद्ध जो युक्तिवाद केलेला होता त्याचा पायाच हे तत्त्ववेत्ते उखडून काढतात. निसर्ग हे माणसाचे एक आयुध आहे, त्याच्यासाठी असलेली एक भाषा आहे किंवा माणसाचा तो सुप्त साहाय्यक आहे, मानवी रूप धारण करण्याची आकांक्षा असलेले असे ते एक अस्तित्व आहे असे रूप निसर्गाला देऊन किंवा निसर्गाला स्वतःचे प्रत्यक्ष अस्तित्व नसते, माणसाने त्याला प्रत्यक्ष अस्तित्वाचे दान केल्यावरच त्याला प्रत्यक्ष अस्तित्व लाभते असा सिद्धांत स्वीकारून





राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

निसर्गाचे 'परकेपण' कमी करण्यात येते. (आपल्या संवेदनांना 'वास्तवतेचे' नाव द्यायचा निर्णय घेऊन आपण प्रतिष्ठा देतो असे ह्यूमने जे विधान केले आहे त्याची ह्या संदर्भात आठवण होईल. अर्थात् आपल्याला लाभलेल्या आणि लाभू शकतील अशा संवेदनांपलीकडे भौतिक वस्तू नसतात ही भूमिका ह्यूमने सुसंगतपणे स्वीकारलेली नाही.)

निसर्गाविषयीची ही जी वृत्ती आहे तिच्याशी निगडित अशी दुसरी वृत्ती आहे. ती म्हणजे नैसर्गिक सौंदर्य हे कलाकृतीपेक्षा खूपच कमी दर्जाचे असते असे मानणे. ग्रीक, लॅटिन साहित्यात आणि त्यांच्यावर आधारलेल्या आधुनिक 'अभिजातवादी' साहित्यात अशी भावना आढळते (आणि हेगेलनेही तिचा पुनरुच्चार केला आहे) की निसर्गाचे जेव्हा एखाद्या शेतात किंवा बागेत परिवर्तन करण्यात येते आणि म्हणून जेव्हा त्याचा रानटीपणा, 'विचित्रपणा' गळून पडलेला असतो तेव्हाच तो रसग्रहण करण्यालायक बनतो, रसविषय बनू शकतो. ख्रिश्चन धर्मशास्त्रज्ञांनी अनेकदा असे म्हटले आहे की, पृथ्वीची निर्मिती झाली तेव्हा ती म्हणजे परिपूर्ण, निर्दोष असा एक गोल होता. पर्वत आणि दऱ्या यानी खडबडीत असलेला आजचा निसर्ग हे ह्या जगाचे भग्न आणि उदास असे अवशेष आहेत; ॲडमच्या पापाची खिन्न आठवण ते आपल्याला करून देतात. निसर्गात केवळ नियमबद्ध, सुरचित अशा, घनाकृती आढळत नाहीत, इतरही आकार आढळतात ह्याचे मालब्रांसला वाईट वाटत असे. अठराव्या शतकातील दर्दी बागवान 'आकृतिवादी' (formalist) होते. ह्या शतकात 'ऑगस्टिनियन' प्रवृत्तीचा परमोत्कर्ष झालेला आढळतो. झाडांना पिरॅमिडचे आकार देऊन आणि वयींना चितीचे आकार देऊन नैसर्गिक आकारांचे नियमबद्ध आकारांत परिवर्तन करण्याचा हे बागवान निकराचा प्रयत्न करीत. हेगेलचे अनुयायी इतके भूमितिवादी नव्हते. पण माणसाने निसर्गाचे रूपांतर केल्यानेच, रानावनांचे सौम्य, प्रसन्न लॅंडस्केपमध्ये परिवर्तन केल्यानेच निसर्गाला त्याचे आदर्श रूप लाभते असा त्यांचाही तितकाच ठाम विश्वास होता. हर्बर्ट स्पेन्सरच्या दृष्टीने, सबंध जगाचे एका प्रचंड बागेत परिवर्तन करणे ही माणसापुढे असलेली एक कामगिरी होती.

तेव्हा आधुनिक पाश्चात्त्य विचारातील दोन प्रमुख परंपरा घेतल्या तर त्यांचे म्हणणे असे मांडता येईल : देकार्तपासून स्फूर्ती घेणाऱ्या परंपरेप्रमाणे निसर्ग निष्क्रिय, तटस्थ असतो, मानवाचे त्याच्याशी असलेले नाते पूर्णपणे निरंकुश अशा झोटिंगासारखे असते, ज्याच्यात कोणतेही क्रियाकारित्व, प्रतिकाराचे कोणतेही तत्त्व नसते अशा द्रव्याला माणसाने वेगवेगळे आकार, रूपे द्यावयाची असतात. दुसरी, हेगेलवादी परंपरा, हिच्या म्हणण्याप्रमाणे निसर्गाचे अस्तित्व केवळ एक शक्यता (in potentia) म्हणून असते; तिला कला, विज्ञान, तत्त्वज्ञान, तंत्रज्ञान ह्यांच्याद्वारा प्रत्यक्ष अस्तित्व देणे, निसर्गाचे रूपांतर करून त्याला मानवी स्वरूप देणे, आपल्याला जे विचित्र परके वाटणार नाही, आपला चेहरा ज्याच्यात प्रतिबिंबित झाला आहे व म्हणून ज्याच्या संदर्भात आपल्याला पूर्णपणे घरच्यासारखे वाटेल असे स्वरूप त्याला देणे ही माणसापुढील कामगिरी असते. बायबलच्या उत्पत्तिअध्यायात (बुक ऑफ् जेनेसिस) माणूस ह्या जगात केवळ राहून अपुरे असलेले जग पूर्ण करतो असे सूचित केले आहे. हेगेलचे मत वेगळे आहे. जग घडविण्यात सहभागी होऊन माणूस ते पूर्ण करतो.

आपण हा जो त्रोटक ऐतिहासिक आढावा घेतला आहे त्याच्यावरून पाश्चात्त्य संस्कृतीचे परिविज्ञानवादी (ecological) टीकाकार एका नवीन धर्माची, नवीन नीतीची, नवीन सौंदर्यशास्त्राची आणि नवीन तत्त्वमीमांसेची मागणी का करीत आहेत, हे ध्यानात येईल. पाश्चात्त्य तत्त्वज्ञानाचा एक खवचट इतिहास लिहिण्यात आला आहे अशी कल्पना करू या. हे सारे तत्त्वज्ञान म्हणजे माणसाला ज्या भीती वाटत असतात, आशंका असतात त्यांचे वेगवेगळ्या मार्गांनी शमन करण्याचा प्रदीर्घ प्रयत्न आहे असे त्याचे वर्णन ह्या इतिहासात करण्यात येईल. हे शमन नैसर्गिक प्रक्रियांपासून माणसाला कोणताही खरा धोका संभवत नाही, कारण एक तर माणसे आपल्या कल्पनांप्रमाणे ह्या प्रक्रियांना कोणतेही रूप अमर्यादितपणे देऊ शकतात, किंवा माणसाचे हित साधले जाईल अशा उद्दिष्टानेच ह्या



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

विश्वाची घडण झाली असल्यामुळे अखेरीस माणसे त्याच्यात सुरक्षित राहणार असे पटवून देऊन करण्यात येते. आणि हे पटवून देताना अगदी उघड असलेली सत्ये नाकारण्याचा निकराचा प्रयत्न करावा लागल्यामुळे अधिकाधिक विक्षिप्त आणि विपरीत भूमिका स्वीकाराव्या लागल्या. असा इतिहास लिहिता येईल पण त्याच्यात पाश्चात्त्य तत्त्वज्ञानाचे अगदी यथार्थ वर्णन करण्यात आले आहे असे म्हणता येणार नाही, आपल्याला लाभू शकतील अशा संवेदना व्यतिरिक्त आणि त्यांच्या पलीकडच्या अशा भौतिक वस्तू नसतात असे मानणारी रूपमात्रसत्तावादी (phenomenalist) भूमिका घेतली तरी तिला काही तार्किक बैठक असते. संवेदनाचे ( perception ) स्पष्टीकरण करण्यासाठी पुढे करण्यात आलेल्या आणि प्रथम-दर्शनी पटण्याजोगी वाटेल अशा एका तात्त्विक उपत्तीपासून ही भूमिका निष्पन्न होते असे तार्किक युक्तिवादांनी दाखवून देता येते आणि ज्या अर्थी अशी उघडपणे विपरीत ( absurd ) असलेली भूमिका ह्या उपपत्तीपासून निष्पन्न होते त्या अर्थी ही उपपत्तीच त्याज्य आहे असे सिद्ध करता येते. तसेच देकार्तने प्रतिपादिलेल्या द्वैतवादाचा अव्हेर करायला तत्त्ववेत्त्यांना सबळ आधार आहे हेही आपण पाहिलेच आहे; अर्थात् देकार्तप्रणीत द्वैत-वादाचा अव्हेर करायला चांगली कारणे आहेत ह्याचा अर्थ त्याच्या जागी तत्त्ववेत्त्यांनी ज्या मानव-केंद्रवादी भूमिकेची स्थापना केली आहे ती सयुक्तिक आहे असे होत नाही. तेव्हा पाश्चात्य तत्त्वज्ञानाची परंपरा केवळ कित्येक मानवी प्रवृत्तींचे आणि भावनांचे समाधान करण्याचे कार्य करते, तिला वस्तुनिष्ठ, तार्किक असा काही आधार नाही असे म्हणणे अतिशयोक्तीचे ठरेल. पण ह्या वर्णनातील अतिशयोक्ती मान्य केली तरी हे वर्णन ह्या तत्त्वज्ञानाचे पूर्णपणे विद्रूप असे दर्शन घडविते असेही म्हणता येणार नाही. ज्यांना माणसांनी निसर्ग-विषयीची आपली जबाबदारी ओळखून ती स्वीकारणे ह्याला निकडीचे महत्त्व आहे असे वाटते. त्यांना हे तत्त्वज्ञान म्हणजे केवळ मानवकेंद्रिवादाचे समर्थन करण्याचा प्रयत्न आहे असे वाटले तर ते समजण्या-सारखे आहे. कारण, निसर्गाची बेदरकारपणे पिळवणूक करण्यापासून माणसांना परावृत्त करण्यासाठी पाश्चात्य तत्त्वज्ञानाने किंवा नीति-शास्त्राने काहीही केलेले नाही; उलट असे करायला त्यांना प्रोत्साहन मिळावे अशीच खटपट त्यांनी केली आहे. निसर्गाचा निर्घृणपणे वापर करणे योग्य का आहे ह्याची वेगवेगळ्या तत्त्ववेत्त्यांनी वेगवेगळी कारणे दिली आहेत. काहींच्या मते निसर्ग ही माणसाच्या हातात असलेली मेणासारखी सामग्री असते आणि त्याला वाटेल तो आकार देण्याचा माणसाला अधिकार असतो. दुसऱ्या काहींचे म्हणणे असे की निसर्गाचा असा वापर करून त्याला मानवी रूप देणे हा निसर्गाचेच सुप्त हित साधण्याचा मार्ग असतो. पण कारणे कोणतीही दिलेली असोत, माणसाने निसर्गाचा निरंकुश वापर करण्यात अयोग्य काहीही नसते अशीच ही शिकवण आहे.

पण प्रचलित तत्त्वमीमांसेमुळे ( मेटॅफिजिक्स ) आणि नीतिशास्त्रामुळे निसर्गाची पिळवणूक करा-यला उत्तेजन मिळते एवढ्याच कारणावरून एक नवीन तत्त्वमीमांसा आणि नवीन नीतिशास्त्र आता घडविले पाहिजे अशी सरळ मागणी जर कुणी केली तर ती निमूटपणे मान्य करण्याचे तत्त्व-वेत्त्यांना कारण नाही. समजा, उद्या कुणी म्हटले की सर्व प्राण्यांचा मेंदू विकसित असतो अशी माण-सांची समजूत झाली तर माणसांची आपल्या परिसराविषयीची वृत्ती कमी विनाशक बनेल, त्यांचे वर्तनही कमी विनाशक होईल म्हणून आपण एक नवीन जीवनशास्त्र घडविले पाहिजे; तर ही मागणी जशी गैर ठरेल तशीच नवीन तत्त्वमीमांसा किंवा नीतिशास्त्र ह्यांसाठी केलेली वरील मागणीही गैर आहे. विशेषत: निसर्ग पवित्र आहे ह्या समजुतीकडे परत वळायला माणसांना तत्त्ववेत्त्यांनी उत्तेजन द्यावे ही जी परिविज्ञानवादी चळवळीच्या आदिमतावादी ( primitivist ) पक्षाचे म्हणणे आहे ते तत्त्व-वेत्त्यांना मान्य होण्यासारखे नाही. झाडे, नद्या, ज्वालामुखी पर्वत ह्यांना त्यांच्याशी युक्तिवाद करून वळविता येते ही समजूत अंधश्रद्धेचा एक प्रकार आहे म्हणून आपण जेव्हा तिचा अव्हेर करतो तेव्हा ते योग्यच असते; ह्या वस्तूंकडून होणाऱ्या वर्तनांचे आकलन करण्याचा योग्य मार्ग विज्ञानात आपल्याला सापडला आहे ही आपली

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

समजतही बरोबर आहे; मानवी संस्कृतीला महत्त्व आहे आणि असे जे आपण मानतो तेही योग्यच आहे आणि संस्कृती निर्माण करण्यासाठी आणि टिकून धरण्यासाठी म्हणून आपण निसर्गात जे परिवर्तन घडवून आणतो ते योग्यच मानले पाहिजे आपण मोठ्या कष्टाने विवेकशीलतेची जी परंपरा उभारली आहे तिचा त्याग करून आपण स्वतःला वाचवू शकणार नाही.

तेव्हा आपण स्वतःला जो प्रश्न विचारला पाहिजे तो असा आहे : परिविज्ञानवादी चळवळीत जो प्रतिगामी, गूढवादी सूर आढळतो तिकडे दुर्लक्ष केले तरी तिच्यात विज्ञानाविषयीच्या ज्या समस्या उपस्थित करण्यात आल्या आहेत त्यांना न्याय देणाऱ्या निसर्गविषयक तत्त्वज्ञानाचे सामान्यपणे स्वरूप कसे असेल ? आपल्याला असे म्हणता येईल की कोणतेही निसर्गविषयक तत्त्वज्ञान जर समाधानकारक ठरायचे असेल तर त्याने पुढील गोष्टी मान्य केल्या पाहिजेत :

१. नैसर्गिक प्रक्रिया आपल्या मार्गांनी जातात, मानवी हिताविषयी त्या उदासीन असतात आणि ज्या रीतीने त्या घडतात ती ध्यानात घेतली तर माणूस पृथ्वीच्या पृष्ठभागावरून समूळ नष्ट व्हायलाही तिच्याकडून काही विरोध होईल असे मानता येणार नाही.

२. माणसे जेव्हा निसर्गावर काही कृती करतात तेव्हा केवळ एका विशिष्ट वस्तूच्या विशिष्ट गुणामध्ये ती बदल घडवून आणीत असतात असे नसते; परस्परांवर क्रिया करणाऱ्या प्रक्रियांच्या एका व्यवस्थेमध्ये ते हस्तक्षेप करीत असतात आणि म्हणून काही नवीन क्रिया–प्रतिक्रियांना चालना देत असतात. आणि अगदी ह्या कारणामुळे त्यांच्या कृतीपासून त्यांनी न कल्पिलेले असे परिणाम घडून येण्याचा नेहमीच धोका असतो.

३. निसर्गाचे आकलन करण्याच्या आपल्या प्रयत्नांत भौतिकीत ज्या प्रकारचे निसर्गनियम आपण शोधून काढतो तशा नियमांच्या शोधाला अनेकदा मर्यादित महत्त्व असते. जीवशास्त्रात किंवा समाजशास्त्रात अशा स्वरूपाचे नियम अवगत करून घेण्यात येत नाहीत व म्हणून ही कनिष्ठ विज्ञाने आहेत अशी तक्रार अनेकदा करण्यात येते. पण उलट तक्रार करता येईल. निसर्गाच्या 'आकलना'चे स्वरूप कसे असते ह्याचे प्लेटो–देकार्त यांनी जे विश्लेषण केले आहे त्याला अतिरेकी महत्त्व देऊ नये असा युक्तिवाद करता येईल. सजीव पदार्थांच्या रचना किंवा सामाजिक रचना समजून घेताना अतिशय व्यापक, सामान्य, अमूर्त पदार्थांमधील फलनात्मक संबंध मांडणाऱ्या नियमांना तितकेसे महत्त्व नसते तर परिस्थितीतील अतिशय विशिष्ट स्वरूपाच्या घटकांची तपशिलवार माहिती करून घेण्याला खरे महत्त्व असते असे आपल्याला म्हणता येईल. ह्या संदर्भात ज्या 'नियमां'ची दखल घ्यावी लागते ते मामुली असतात, त्यांची नेमकेपणे मांडणीही करता येत नाही. काय शक्य आहे ह्याची मर्यादा आखायला काय तो ह्या नियमांचा उपयोग होतो. वर घेतलेले देवमाशांचेच उदाहरण परत घेऊ. इतर प्राण्यांप्रमाणे देवमाशांनाही अन्न भक्षण करावे लागते आणि तेही प्रजोत्पत्ती करतात. प्रत्येक माणसाला अन्न सेवन करावे लागते, प्रत्येक प्राण्याची प्रजोत्पादन करण्याची एक तऱ्हा असते ह्याला पाहिजे तर 'जीवशास्त्रीय नियम' म्हणूया. पण हा नियम देवमाशांनाही लागू पडतो एवढी माहिती झाल्यानंतरही देवमाशांविषयीची जवळजवळ सारी विवक्षित महत्त्वपूर्ण माहिती शोधून काढायची राहिलेलीच असते.

निसर्गाविषयीच्या समाधानकारक तत्त्वज्ञानाने ज्या कित्येक सामान्य अटींचे पालन केले पाहिजे असे मी वर म्हटले आहे त्या थोडक्यात अशा मांडता येतील. निसर्गाचे 'विचित्रपण', परकेपण सहन करायला, आपले अस्तित्व आणि हित ह्यांच्याविषयी नैसर्गिक प्रक्रिया पूर्णपणे उदासीन असतात, —म्हणजे त्या उदासीनतेची वृत्ती धारण करतात असे नव्हे तर आपल्याविषयी आस्था बाळगायला त्या असमर्थ असतात, त्या इतक्या गुंतागुंतीच्या असतात की त्यांच्यावर आपला काबू बसणे आणि त्यांचे कसेही परिवर्तन करायला आपण समर्थ बनणे हे शक्यतेच्या कोटीपलीकडचे असते ही वस्तुस्थिती सहन करायला तत्त्ववेत्त्यांनी शिकले पाहिजे. अर्थात् हे निष्कर्ष इतके मामुली आहेत, इतके उघडपणे सत्य आहेत की ते खास नमूद करायला कुणालाही लाज वाटेल. पण



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

बहुतेक निसर्गविषयक पारंपरिक तत्त्वज्ञान ह्या निष्कर्षांशी विसंगत आहे हे आपण आतापर्यंत केलेल्या विवेचनावरून स्पष्ट झाले असणार. आणि ज्या प्रमाणात ही विसंगती आढळून येते त्या प्रमाणात आपल्याला एका 'नवीन तत्त्वमीमांसेची' आवश्यकता आहे हे म्हणणे योग्य ठरते. ही नवीन तत्त्वमीमांसा मानवकेन्द्रितता मनापासून वर्ज्य मानील आणि त्याच्यात अंतर्भूत असलेल्या गुंतागुंतीची योग्य त्या गंभीरपणे दखल घेईल. नैसर्गिक प्रक्रियांचे अस्तित्व माणसांवर अवलंबून असते, किंवा माणसे अमर्यादपणे कसेही रूप त्यांना देऊ शकतात किवा माणूस आणि त्याची संस्कृती सातत्याने टिकून राहील ह्याची शाश्वती मिळेल अशा रीतीनेच त्यांची घडण करण्यात आली आहे असे तर ती मानणारच नाही.

निसर्गाविषयीचे ह्या स्वरूपाचे तत्त्वज्ञान अर्थात् पूर्णपणे नवीन असणार नाही. ज्याला निसर्गवादी तत्त्वज्ञान ( naturalism ) म्हणतात त्याच्या वेगवेगळ्या प्रकारांनी, त्याचा पाया अगोदरच घातलेला आहे. पण डार्विनवादी जीवशास्त्राप्रमाणे निसर्गवादी तत्त्वज्ञानही अनेकदा निसर्गाचे 'विचित्रपण' कमी करण्याचा प्रयत्न करते आणि ह्यात त्याला ह्या जीवशास्त्राचा पाठिंबा मिळतो. पण निसर्गाचे मानवीकरण, आध्यात्मीकरण करून हे विचित्रपण ते कमी करत नाही तर माणसाचे निसर्गीकरण करून ते कमी करायला ते बघते. मी आतापर्यंत 'निसर्ग' हा शब्द ज्या प्रकारे वापरला आहे तो मूलतःच दिशाभूल करणारा आहे असे अनेक निसर्गवादी तत्त्ववेत्ते म्हणतील; निसर्ग म्हणजे माणूस हा ज्याचा भाग आहे, माणूस हा ज्याचा पूर्णपणे घटक असल्यामुळे जे माणसाला परकी असू शकत नाही असे ते अस्तित्व आहे असाच निसर्गाचा विचार केला पाहिजे. आणि एका अतिशय महत्त्वाच्या अर्थाने माणसे आणि माणसांनी बनविलेल्या वस्तू निसर्गाचे भाग असतात- ह्याविषयी माझे निसर्गवाद्यांशी एकमतच आहे; कारण ह्या दोन्ही गोष्टी निसर्गनियमांच्या अधीन असतात. देकार्तने निसर्गावर ज्या तऱ्हेच्या तात्त्विक 'विचित्रपणा'चा आरोप केला होता ते विचित्रपण निसर्गाच्या ठिकाणी नसते. पण निसर्गाचे हे जे दोन भिन्न अर्थ आहेत त्यांची दोन भिन्न कार्ये आहेत; ते वेगवेगळ्या प्रकारच्या संदर्भांत महत्त्वाची कामगिरी बजावतात. निसर्गवादी तत्त्ववेत्त्यांना अनेकदा संक्षेपणवादी ( reductionist ) भूमिका स्वीकारायचा मोह होतो. ( म्हणजे अस्तित्वाची उच्चतर पातळी आणि कनिष्ठ पातळी यांच्यांतील भेद नाकारायचा, उच्चतर पातळी हे कनिष्ठ पातळीचेच, त्या पातळीवरचेच कदाचित अधिक गुंतागुंतीचे रूप आहे असे मानायचा मोह होतो. ) म्हणजे माणसांचे इतर माणसांशी होणारे व्यवहार त्याच्या इतर वस्तूंशी होणाऱ्या व्यवहारांहून काही महत्वाच्या बाबतीत भिन्न असतात, आपली ज्यांच्याशी चांगली ओळख नसते अशी माणसे आपल्याला जितकी 'परकी' असतात त्याहून निसर्ग अधिक 'परका' असतो ही गोष्ट ते नाकारू पहातात. पण ह्या मोहाचा प्रतिकार केला पाहिजे. माणसे आणि माणसांनी निर्मिलेल्या वस्तू यांच्या ठिकाणी एक वैशिष्ट्यपूर्ण मूल्य आणि महत्त्व असते असे म्हणण्यात काहीच मानवकेंद्रितता नाही. किंवा माणसे एकमेकांशी एका अनन्यसाधारण प्रकारे संबंध जोडू शकतात- विशेषतः ती विधाने मांडू, नाकारू शकतात ह्याच्यातून पण त्या बरोबरच, अस्तित्ववादी म्हणतात त्याप्रमाणे भविष्याविषयी त्यांना जी चिंता असते तीतूनही त्यांचे हे अनन्यसाधारणत्व दिसून येते. असे सुचविणेही मानवकेन्द्री ठरत नाही. अनेक संदर्भांत मानवी गोष्टी आणि मानवी नसलेले, एका विशिष्ट, मर्यादित अर्थाने नैसर्गिक असलेले विश्व यांच्यांत भेद करणे आवश्यक आणि सयुक्तिक असते.

तेव्हा कुणी जर असे म्हणाला की जगात जे घडत आले आहे, ते हे की मानवजाती ही इतर प्राणिजातीपेक्षा प्रबळ असल्याने, वेगवेगळ्या प्राणिजातीमध्ये जो जीवनकलह निसर्गरहाटीप्रमाणे चालू असतो त्याच्यात आपल्याशी स्पर्धा करणाऱ्या जातींचा मानवजाती नाश करीत आली आहे, तर हे म्हणणे अपुरे ठरेल; किंवा ह्या प्राणिजाती अस्तंगत झाल्याचा खेद करणे, हे जगात अजून डिनोसॉर आढळत नाहीत अशी तक्रार करण्याइतकेच विचित्र ठरेल. इतर कोणत्याही प्राणिजातीप्रमाणेच माणूसही इतर जातींच्या जीवावर, त्यांचा बळी घेऊनच आपले अस्तित्व टिकवून धरू शकतो, हे पूर्णपणे सत्य आहे. पण काय घडते आहे हे माणसे

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

पाहू शकतात; आपल्याशी स्पर्धा करणाऱ्या प्राणिजाती नष्ट होत आहेत हे माणसांना दिसून येते; ह्या जातींचा विनाश होत राहिला तर त्याचे काय परिणाम होतील ह्याचा माणसे विचार करू शकतात; आणि आपल्या वर्तनात बदल घडवून आणून ते कमी विनाशक करणे, ह्या जातींचे संरक्षण करणे हे त्यांना तत्त्वतः तरी शक्य असते. कोणत्याही समाधानकारक तत्त्वमीमांसेची सुरवात माणूस अनेक दृष्टींनी पाहता, मूलतः अनन्यसाधारण नाही हे सत्य ओळखण्यापासून होते. पण इतर अनेक दृष्टींनी पाहता माणूस अनन्यसाधारण आहेच. ज्या 'नवीन तत्त्वमीमांसे'च्या शोधात आपण आहोत त्याला जर वस्तुस्थितीशी इमान राखायचे असेल तर ते निसर्गवादी असावे लागेल पण ते 'संक्षेपणवादी' असायचे कारण नाही. अशा तत्त्वमीमांसेला सुव्यवस्थित आकार देणे, त्याच्या मूलतत्त्वात गर्भित असलेले सर्व निष्कर्ष स्पष्ट करणे हे माझ्या मते तत्त्वज्ञानापुढे असलेले सर्वात महत्वाचे कार्य आहे.

पाश्चात्य जगाला आता एका नवीन नीतिशास्त्राची, निसर्गाविषयीच्या जबाबदारीची जाणीव ज्याच्या केंद्रस्थानी आहे अशा नीतिशास्त्राची, जरूरी आहे असेही म्हणण्यात येते. हे कितपत संयुक्तिक आहे? ही मागणीही मर्यादेपलीकडे ताणण्यात येते असे मला वाटते. अनेकदा असे सुचविण्यात येते की माणसे आणि वनस्पती, प्राणी व जीवावरण (Bio-sphere) यांचा मिळून एक 'परिवार' (community) बनलेला आहे आणि ह्या परिवारातील प्रत्येक घटकाला त्याचे स्वतःचे हक्क असतात– आणि जगण्याचा हक्क आणि आदराने वागविले जाण्याचा हक्क हे ह्या हक्कात समाविष्ट असतात. स्टोइक तत्त्ववेत्त्यांनी ह्या सिद्धांताला फार पूर्वी विरोध केला होता. निसर्गाशी न्यायाने वागण्याचे बंधन जर माणसाने स्वतःवर घालून घेतले तर मानवी संस्कृती तर अशक्य होईलच पण माणसांना आपले अस्तित्व टिकवूनही धरता येणार नाही. आदिमतावादी (primitivist) हा युक्तिवाद बरोबर उलटवितात. माणसाच्या निसर्गाशी होणाऱ्या अन्याय्य वर्तनावर संस्कृती आधारलेली असल्यामुळे आपण संस्कृतीचा त्याग केला पाहिजे. उदा., फॉर्फिरीने अशी भूमिका स्वीकारली होती की माणसांनी आपल्या गरजा शक्य तितक्या कमी केल्या पाहिजेत आणि ह्या किमान परिस्थितीत झाडांची जी फळे त्या झाडांचे अस्तित्व टिकून राहण्यासाठी त्यांना आवश्यक नसतील त्यांच्यावरच केवळ माणसांनी गुजराण केली पाहिजे.

पण झाडांना स्वत:साठी जी फळे आवश्यक नसतात त्यांची अनेक सूक्ष्म जीवजंतूंना जरूरी असेल. मी वर सुचविले आहे त्याप्रमाणे काही प्रमाणात लुटारू झाल्याशिवाय माणसांना आपले जीवन टिकवून धरता येणारच नाही. पण ह्यूमने म्हटले आहे त्याप्रमाणे माणसांनी प्राण्यांशी माणुसकीने, कनवाळूपणे वागले पाहिजे असे म्हणणे वेगळे आणि माणसांनी प्राण्यांशी न्यायाने वागले पाहिजे असे म्हणणे वेगळे. पहिला सिद्धांत प्राण्यांनाही वेदना होऊं शकतात एवढ्याच साध्या गृहीतकृत्यावर आधारलेला आहे; दुसरा सिद्धांत प्राण्यांचेही हक्क, हितसंबंध असतात, ज्यांना न्यायाची संकल्पना लावता येते अशा स्वरूपाचे प्राण्यांचे हक्क आणि हितसंबंध असतात ह्या गृहीतकृत्यावर आधारलेला आहे आणि हे गृहीतकृत्य तितकेसे पटण्यासारखे नाही. लिओनार्ड नेल्सनसारख्या तत्त्ववेत्त्यांनी ह्या मताचा स्वीकार केलेला आहे. पण प्राण्यांचे 'हितसंबंध' असतात असे म्हणणे संयुक्तिक आहे अशी माझी खात्री पटत नाही; अर्थात् 'गरजा' म्हणजेच 'हितसंबंध' असे आपण म्हणायला तयार असू तर गोष्ट वेगळी; पण एखाद्या झाडाला अमुक अमुक गोष्टींची गरज असे, असे कुणी म्हटले तर त्या गोष्टी मिळण्याचा त्याला अधिकार आहे असा त्याचा अर्थ होत नाही. वनस्पतींशी किंवा प्राण्यांशी अमुक एका पद्धतीने वागणे गैर आहे, ह्या म्हणण्याहून त्यांना वेगळ्या रीतीने वागविले जाण्याचा अधिकार असतो हे म्हणणे पूर्णपणे वेगळे आहे.

परिविज्ञानवाद्यांच्या अर्थाने माणसे, वनस्पती, प्राणी आणि जीवावरण हे एकाच परिवाराचे भाग आहेत यात शंका नाही; ह्यातील प्रत्येक घटक आपले अस्तित्व टिकवून धरण्यासाठी इतर घटकांवर अवलंबून असतो. पण ज्या अर्थाच्या परिवारामधून हक्क, कर्तव्ये, बंधने उद्भवतात त्या अर्थाने ह्या

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

परिवार नसतो. माणसे आणि प्राणी परस्परां-विषयीच्या जबाबदाऱ्यांनी, परस्परांशी असलेल्या उपकारी संबंधांनी एकत्र गोवलेले नसतात. ह्यामुळे, निसर्गवादी तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनेही निसर्ग 'विचित्र', परकाच राहतो.

ह्या संदर्भात आणखीही एक गोष्ट नमूद केली पाहिजे. आपल्या परिसराची लूटमार करणाऱ्याविरुद्ध जे कडक उपाय आपण योजू त्यांचे समर्थन करायला आपली नेहमीची अतिशय परिचित नैतिक तत्त्वेही बऱ्याच प्रमाणात पुरेसा समर्थ आधार आपल्याला देऊ शकतात. आपल्या नद्यांची गटारे बनविणाऱ्यांना, हवा दूषित करून श्वासोच्छ्वास करणे दुर्घट बनविणाऱ्यांना, अतिरिक्त लोकसंख्येचा भर सहन करणाऱ्या जगात अपत्यांना जन्माला घालणाऱ्याना– आणि ही पुढील गोष्ट थोडीशी अधिक विवाद्य आहे – भावी पिढ्यांसाठी आवश्यक असलेल्या नैसर्गिक साधनसंपत्तीची उधळपट्टी करणाऱ्यांना आपण जो दोष देतो त्याचे समर्थन करण्यासाठी कोणत्याही 'नवीन नीतिशास्त्राचे' साहाय्य घेण्याची जरूरी नाही. माणसांच्या खास हितसंबंधांशी ज्या गोष्टींचा उघडपणे संबंध पोहचत नाही त्यांच्या संदर्भात फारतर 'नव्या नीतिशास्त्रा'चा प्रश्न उद्‌भवू शकेल. वन्य प्रदेशांचे आणि वन्य प्राणिजातींचे संरक्षण करणे इष्ट आहे ह्या धोरणाचे सुद्धा परिचित उपयुक्ततावादी पद्धतीने बऱ्याच प्रमाणात समर्थन करता येईल.

पण एका सिद्धांताचा आपल्याला निश्चितपणे त्याग करावा लागेल. तो म्हणजे मानवी हितसंबंधांशी जेव्हा काही संबंध पोहचत नसेल तेव्हा निसर्गाशी कसाही व्यवहार केला तरी माणसाला नैतिक दोष लागू शकत नाही हा ऑगस्तिनप्रणीत सिद्धांत. हा सिद्धांत आता त्याच्या मूळच्या अनिर्बंध स्वरूपात फारच थोडे तत्त्ववेत्ते स्वीकारतील. प्राण्यांशी क्रूरतेने वागल्यामुळे माणसांची साक्षात् हानी झालेली जेव्हा आढळून येते तेव्हाच असे वर्तन नैतिकदृष्ट्या गर्ह्य ठरते ह्या जुन्या सिद्धांताचा अव्हेर करताना अलिकडच्या तत्त्ववेत्त्यांत जे एकमत आढळून येते ते लक्षणीय आहे. आपल्या पूर्वसूरीमध्ये एक प्रकारचे नैतिक आंधळेपण होते असे दोषारोप ते करतात. प्राण्यांना निष्कारण यातना भोगायला लावणे गैर आहे हे जर कुणाला दिसत नसेल तर ते आंधळेपण ठरते आणि ह्या आंधळेपणाचे मूळ धर्मशास्त्रात आहे असे त्यांचे म्हणणे होते. पण नैतिक तत्त्ववेत्त्यांची निसर्गाविषयी, विशेषतः निसर्गाचे जे भाग अचेतन आहेत आणि म्हणून ज्यांना काही वेदना होऊ शकत नाही त्यांच्याविषयी जी वृत्ती आहे ती पाहता ते काही प्रमाणात अजूनही 'नैतिकदृष्ट्या आंधळे' असणे शक्य नाही का असा प्रश्न विचारावासा वाटतो.

विध्वंसक प्रवृत्तीसाठी जे नैतिक दूषण आपण देतो ते मालमत्तेचा नाश करणाऱ्यापुरते मर्यादित ठेवण्याकडे त्यांचा आणि आपलाही कल असतो. पण मानवनिर्मित वस्तूंची हानी किंवा नाश करणाऱ्यांना हे दूषण देणे जितके योग्य असते तितकेच निसर्गाची हानी किंवा नाश करणाऱ्यांनाही ते देणे, प्रथमदर्शनी तरी, योग्य ठरेल. बाउमगार्टन जिचा 'विध्वंसनाची वृत्ती' असा निर्देश करून निषेध करतो तिच्यात मालमत्तेच्या, आपल्या मानवबंधूंना उपयुक्त ठरू शकतील अशा वस्तूंच्या जाणून बुजून केलेल्या नाशाचा जसा अंतर्भाव होतो तसाच नैसर्गिक वस्तूंच्या जाणून बुजून केलेल्या नाशाचाही अंतर्भाव होतो. ह्यामुळे पृथ्वीवरील शेवटच्या माणसाने आपले अखेरचे दिवस वस्तूंचा विध्वंस करण्याच्या बेहोषीत घालविले तर तो अपराधी ठरेल; त्याच्या ह्या कृत्याने दुसऱ्या कोणत्याही माणसाची काहीही हानी होणार नसली तरी त्याचे वर्तन सदोष ठरेल.

त्याचप्रमाणे कलाकृतीत रस घेता न येणे ही जशी एक मानवी उणीव आहे तशीच नैसर्गिक दृश्यात रस घेता न येणे हीही एक मानवी दुर्बलता आहे. निसर्ग हा केवळ आपल्या उपयोगासाठी असतो, त्याच्यात रस घ्यावा, त्याचा आनंद अनुभवावा ह्यासाठी नसतो ह्या ऑगस्तिनप्रणीत सिद्धांतापासून जेव्हा आपण आपली मुक्तता करून घेऊ तेव्हा 'विध्वंसक प्रवृत्ती,' 'अरसिक पोटभरूपणा' ह्या नैतिक संकल्पना, झाडे निसर्गदृश्ये यांच्याशी असलेल्या माणसांच्या संबंधांना उद्देशून लावता येतात हे उघड होईल. 'क्रौर्य' ही नैतिक संकल्पना माणसांच्या प्राण्यांशी होणाऱ्या वर्तनाला उद्देशून लावता येते हे जसे उघडपणे दिसते तसे हेही उघडपणे दिसेल. रोमॅंटिसिझमने हे काही प्रमाणात


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

जाणले होते आणि म्हणून त्याने आपल्याला निसर्गाकडे पहायला प्रोत्साहन दिले, निसर्ग हे केवळ साधन आहे असे न मानता त्याच्या स्वतः-साठीच त्याचे दर्शन घ्यायला उत्तेजन दिले ह्याच्यात रोमँटिसिझमचे बरेचसे महत्त्व साठविलेले आहे. पण निसर्गाकडे पाहण्याची ही दृष्टी स्वीकारण्यासाठी निसर्ग आणि ईश्वर यांच्यात तादात्म्य आहे, निसर्ग म्हणजेच ईश्वर अशी जी रोमॅंटिसिझमची शिकवण आहे ती मान्य करण्याचे कारण नाही. किंबहुना निसर्गाचे असे दैवीकरण करण्याने ज्या तात्त्विक समस्या निर्माण होतात त्या बाजूला सारल्या तरी त्याच्यामुळे अनेक नैसर्गिक प्रक्रियांमध्ये, निसर्गातील परस्परसंबंधांमध्ये जी क्षीणता आणि भंगुरता असते तिच्याकडे आपले पुरेसे लक्ष रहात नाही आणि ह्याच्यात धोका आहे. परिविज्ञानवादी चळ-वळीने ह्या नैसर्गिक भंगुरतेकडे आपले जोराने लक्ष वेधले आहे.

सामान्यपणे असे म्हणता येईल की निसर्गाचे स्वातंत्र्य पूर्णपणे मान्य करायला जर आपण तयार झालो, नैसर्गिक प्रक्रिया आपल्या स्वतःच्या गुंता-गुंतीच्या मार्गाने उलगडत जातात ही वस्तुस्थिती स्वीकारायला तयार असलो तर मग प्रत्यक्षात ज्या मार्गांनी ह्या घटना घडतात त्यांची कदर करावी अशी आपली वृत्ती अधिक स्वाभाविकपणे बनेल. नैसर्गिक प्रक्रियांचे मग आपण कौतुकाने दर्शन घेऊ, त्यांतील ऐन्द्रिय, संवेदनाजन्य आनंदाचे सेवन करू, त्यांच्यांत घडामोडी कशा करता येतील ह्यांच्या सोप्या युक्त्याप्रयुक्त्यांचा शोध घेत न बसता त्यांच्यां-तील साऱ्या संमिश्रतेचा ताटस्थ्याने अभ्यास करू. असे करणे आपल्याला अशक्य असते, जोपर्यंत आपल्याला निसर्ग 'परका' वाटत असतो तोपर्यंत त्याच्याविषयी आपल्याला काही आस्था वाटणे, आपण त्याच्यात कांही रस घेणे अशक्य असते असे जेव्हा आपण मानतो तेव्हा आपण स्वतःला निष्का-रण कमी लेखीत असतो; आपल्या अहंकेंद्रीपणावर मात करून तटस्थ, निरपेक्ष वृत्ती धारण करण्याची आपली शक्ती असते तिची पुरेशी दखल आपण घेत नाही. निसर्गाविषयीच्या नवीन नैतिक वृत्ती निर्माण होणे हे अशा रीतीने निसर्गाविषयीच्या नवीन अधिक वस्तुनिष्ठ तत्त्वज्ञानाचा उदय होण्या-वर अवलंबून आहे. आपल्या नैसर्गिक परिसरा-विषयी आपल्याला परिणामकारक अशी आस्था वाटायची असेल तर निसर्गाविषयींच्या वस्तुनिष्ठ तत्त्वज्ञानावरच ती सुरक्षितपणे आधारता येईल.

---


*With Best Complimentsr Fom.....*

# M/S. L. R. CHAWLA & CO.

ENGINEERS & CONTRACTORS

— *Specialists in* —

Reclamation Project, Asphalt, Concrete, Road, Bridges & Dams.

**17, Navrang, 519, Linking Road**
**KHAR, BOMBAY- 52.**
PHONE No. 534940 & 547959



**Dhom Dam Project,**
**(Masonary Portion) 120-3**
**Mr. A. N. Nangia.**


अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

**ग्रंथ – परिचय : विश्वास कानडे**

# अ सेप्रिट रिॲलिटी : कार्लोस कास्टानेडा

[ कार्लोस कास्टानेडाचा प्रस्तुत ग्रंथ 'पेंग्विन बुक्स' या मालेत १९७१ मध्ये प्रसिद्ध झाला. पृ. २६९, किंमत – यू. के. ४५ पेन्स ].

पुस्तकांच्या जॅकेट्सवरचा मजकूर साधारणपणे अतिशयोक्तीचा असतो. पण या पुस्तकाच्या मलपृष्ठावरील थिओडर रोस्झाक यांच्या अभिप्रायासंबंधी तसे म्हणता यावयाचे नाही, कारण तो अभिप्राय म्हणजे पुस्तकाचे फार नेमके आणि चपखल वर्णन आहे. अभिप्राय असा :

"A book that soars through the mind like a comet, rare, burning and beautiful."

वैयक्तिक प्रतिक्रिया व्यक्त केल्याखेरीज ज्या पुस्तकांचा परिचय होऊच शकत नाही अशा कोटीतल्या पुस्तकांपैकी हे एक पुस्तक आहे. हे पुस्तक वाचायचे म्हणजे त्यातून काही ठराविक गोष्टी घेऊन पुढे जायचे असे होत नाही. हे वाचायचे म्हणजे त्यांत गुंतावयाचे– आणि गुंतावयाचे ते किती ? तर, पानापानांत, ओळीओळींत, शब्दाशब्दांत, आणि, आपल्या नकळत, लेखकाच्या प्रेरणेत, तिच्या अथक शोधात आणि त्यातून समोर उमलू लागणाऱ्या एका भीषण-सुंदर वास्तवात, एका 'दर्शना'त.

या पुस्तकाचे लेखक कार्लोस कास्टानेडा हे यू. सी. एल्. ए. विद्यापीठाचे मानववंशशास्त्राचे विद्यार्थी असताना मेक्सिकोमधील सोनोरा येथील याकी इंडियन्स ज्या औषधी वनस्पतींचा उपयोग करतात त्यांचा अभ्यास करण्यासाठी तेथे गेले होते. तेथे त्यांची गूढविद्या (Sorcery) जाणणाऱ्या वृद्ध याकी इंडियन डॉन वॉनशी ओळख झाली. ही ओळख एका प्रगल्भ गुरु-शिष्य संबंधाचा शुभारंभ ठरली. या संबंधातून निर्माण झालेल्या चार क्रांतिकारी पुस्तकांपैकी 'अ सेप्रिट रिॲलिटी' हे कालानुक्रमे दुसरे. पहिले पुस्तक १९६८ साली प्रसिद्ध झाले –"द टीचींग्झ ऑव् डॉन वॉन : अ याकी वे ऑव् नॉलिज". त्यानंतर हे दुसरे पुस्तक १९७१ साली आणि "जर्नी टु इख्तलान" ( पीएच. डी प्रबंध ) व "टेल्स ऑव् पॉवर" ही अनुक्रमे १९७२ व १९७४ साली प्रसिद्ध झाली. पैकी, कास्टानेडाने मानववंशशास्त्रीय संशोधनामध्ये घातलेली क्रांतिकारक स्वरूपाची भर कशाप्रकारची आहे याचा उत्तम परिचय प्रस्तुत पुस्तक करून देते.

त्याचबरोबर या संशोधनाने प्रकट केलेले याकी इंडियन्सचे 'जीवनदर्शन' हे भारतीय 'दर्शना'च्या किती जवळचे आहे हेही ह्या पुस्तकामुळे उत्कटपणे जाणवते.

कास्टानेडाचे संशोधन ही खरीखुरी तपश्चर्या होती. १९६० ते १९७४ ह्या चौदा वर्षांच्या काळातले हे संशोधन आहे. त्यापैकी अनेक वर्षे त्यांनी गुरूच्या प्रत्यक्ष सहवासात आणि त्याच्या विद्येचा अभ्यास करण्यात घालविली. ह्या निदिध्यासाचे स्वरूप कमीतकमी तीन प्रकारचे तरी होतेच.

एक, अमेरिकेच्या आग्नेयीकडे व मेक्सिकोच्या वायव्येला राहणाऱ्या याकी इंडियन लोकांमध्ये प्रचलित असलेल्या औषधी वनस्पतींचा अभ्यास करणे. दोन, त्यांना– किंवा त्यांच्यामधील डॉन वॉन – सारख्या सिद्ध पुरुषांना– ज्ञात असलेल्या एका



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

निराळ्या वास्तवाचा ( अ सेप्रिट रिॲलिटी ) शोध घेण्याच्या ज्या विधि–पद्धती होत्या त्या आत्मसात् करून त्याप्रमाणे आचरण करणे. असे करण्यासाठी एक फार मोठा त्याग आवश्यक होता. तो म्हणजे, ज्ञानसाधनेची प्रचलित वैज्ञानिक दृष्टी पूर्णपणे गुंडाळून ठेवून एका गाढ श्रद्धेने स्वतःला डॉन वॉनच्या स्वाधीन करणे. अभ्यासाच्या किंवा संशोधनाच्या विषयाशी तादात्म्य ह्यापूर्वी अनेक मानववंशशास्त्रज्ञांनी साध्य केले होते. पण कास्टानेडाच्या तादात्म्याची जात आणि प्रत ही फार उच्च कोटीची मानली गेली आहे. अनेकदा स्वतःला मृत्यूच्या दाढेत आपण झोकून देतो आहोत असे वाटत असूनही ते कचरले नाहीत. त्यांनी 'जीवी' धरलेले धारिष्टय हे खऱ्या श्रेष्ठ धारिष्टयाच्या कोटीतले आहे.

तीन, मंत्र, तंत्र, गूढविद्या, रूढी आणि समजुती इत्यादींच्या अभ्यासातून जाणवणाऱ्या त्या अद्भुत 'वास्तवा'चे सर्वंकष स्वरूप समजावून घेणे. एवढेच नव्हे तर बुद्धिनिष्ठ व विज्ञाननिष्ठ पाश्चिमात्य संस्कृतीत वाढलेल्या माणसाला त्याचे नीट दर्शन व्हावे म्हणून, मूळ संस्कृतीला व त्या अद्भुत वास्तवाला अन्याय होणार नाही अशा संकल्पना योजून त्याच्या आधाराने एक अंतर्गत सुसंगती असलेली बुद्धिगम्य रचना करणे.

ह्या तीन्ही गोष्टी साध्य करण्यासाठी कशाप्रकारचे शारीरिक, बौद्धिक व मानसिक परिश्रम आवश्यक असतात याची जाणीव नुसत्या कल्पनेने होणार नाही. आणि तरीही ह्या सर्व लेखनात एक अत्यंत विलोभनीय असा साधेपणा आहे, सहजता आहे.

ॲरिझोनामधील एका बस-डेपोच्या प्रतीक्षागृहात कास्टानेडाची आणि वॉन मेटस ऊर्फ डॉन वॉनची प्रथम भेट झाली. या ओझरत्या भेटीतच कास्टानेडाच्या पुढील प्रदीर्घ साधनेची सुरुवात झाली. वर्षाच्या आतच डॉन वॉनने आपण 'ब्रूजो' ('brujo'– ह्या स्पॅनिश शब्दाचा अर्थ गूढविद्या जाणणारा, मांत्रिक, वैद्य अशा प्रकारचा आहे.) असल्याचे सांगितले, व तेव्हापासून कास्टानेडाने त्यांचे शिष्यत्व स्वीकारले. ह्या गुरु-शिष्य संबंधांचा पहिल्या चार वर्षांचा वृत्तांत पहिल्या खंडात आहे. मध्यंतरी खंडित झालेला हा संबंध गुरु-शिष्य मैत्रीच्या स्वरूपात १९६८ मध्ये पुनः सुरू झाला. प्रस्तुत पुस्तक ह्या पुनर्भेटीनंतरचे आहे.

डॉन वॉन काळा, मध्यम देहयष्टीचा, विलक्षण चपळ. कास्टानेडा त्याच्या सहवासात सतत अस्वस्थ होत असे. पहिल्या भेटीतच डॉन वॉनच्या भेदक आणि शोधक नजरेने त्याचे लक्ष वेधून घेतले होते. स्वतःच्या अहंकाराच्या डोलाऱ्यातील पोकळीची जाणीवपण तीव्रपणे त्याला झाली होती. त्यांच्या संगतीत राहू लागल्याबरोबर स्वतःकडे व स्वतःच्या जीवनपद्धतीकडे पाहण्याचा दृष्टिकोन बदलण्याची त्याला गरज भासू लागली. पुस्तकाचा पहिला भाग 'दर्शना'ची पूर्वतयारी वर्णन करणारा आहे. दुसऱ्या भागात 'दर्शन' आहे. कास्टानेडाच्या मते ह्या अमेरिकन इंडियन लोकांच्या दृष्टीने मंत्रविद्या (ज्याला सर्वसाधारणपणे जादूटोणा, गूढविद्या, चेटूक इ० प्रकारे संबोधण्यात येते) ही एक अत्यंत गंभीर, भक्कम अधिष्ठान असलेली आचारप्रणाली आहे. ज्याप्रमाणे पाश्चात्त्य समाजात विज्ञानाला प्रतिष्ठा आहे, त्याचप्रमाणे ह्या लोकांमध्ये मंत्रविद्येला प्रतिष्ठा आहे. ह्या विद्येचा मूलाधार असा :

दैनंदिन जीवन हे खरे नाही. आपण समजतो त्याप्रमाणे ते 'तिथे' ('out there') नाही. ते मायावी आहे. आपण जे जीवन म्हणून संबोधतो ते केवळ एक 'वर्णन' आहे. बाल्यावस्थेपासून तेच तेच 'वर्णन' आपल्या कानांवर आदळत असल्यामुळे ते आपण आत्मसात् करतो, आणि जग किंवा जीवन म्हटले म्हणजे ते 'वर्णन' करून मोकळे होतो. ह्या मायावी वास्तवाचे आपण घटक / सदस्य बनतो. बालकाला ह्या वर्णनातून जग मिळण्यापूर्वी ह्या जगाचे जे वास्तव दर्शन झालेले असते त्याची एवढीशीही आठवण ह्या सातत्याने होणाऱ्या 'वर्णना'च्या माऱ्याने शिल्लक राहत नाही. खऱ्या, वास्तव जीवनाला / जगाला आपण कायमचे पारखे होतो. प्रत्येक घटनेचे, संवेदनेचे 'ज्ञान' आपल्याला ह्यानंतर ह्या 'वर्णना'ने वेढलेल्या, परिभाषेत होऊ लागते. 'दर्शना'ची पूर्वतयारी म्हणजे ह्या वेढणाऱ्या, सर्वव्यापी मायेतून बाहेर येण्याची साधना. ह्या मायावी जीवनाच्या अप्रतिहत प्रवाहाला थांबवणे. डॉन वॉनच्या शब्दात – हे जग थांबवणे.

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

हे करावयाचे म्हणजे ह्या 'वर्णना'चा त्याग करायचा. तसे केले तरच एका नव्या (म्हणजे खऱ्या) वास्तवाचा साक्षात्कार होऊ शकेल.

हे सारे जरी कास्टानेडाला आता सुस्पष्टपणे कळू शकत असले तरी ह्या आकलनापर्यंत येऊन पोहोचण्यासाठी त्याला जो प्रवास करावा लागला तो फार जिकीरीचा, जीवघेणा होता. त्यात पीयोट (Peyote), जिमसन वीड (Jimson weed) व मश्रूम (of Psylocebe genus) ह्या मनःसंभ्रम निर्माण करणाऱ्या (hallucinogenic, psychotropic) वनस्पतींचे सेवन होते, तसेच रात्रीबेरात्री घोर एकान्तस्थळी जाऊन काही 'विधी' करणेही होते. ह्यातला सगळचांत जीवघेणा भाग असा की बुद्धीला पटेल अशी कुठलीच कारणमीमांसा/ तर्करचना ह्या कृतींमागे नसायची. दरवेळी कास्टानेडाच्या हे लक्षात यायचे की आपण विचारलेले प्रश्न (जे वरवर फार स्वाभाविक व रास्त वाटत) हे मुळातच अप्रस्तुत होते. जीवनाचे अविभाज्य अंग बनलेल्या ह्या 'वर्णन'पद्धतीचा कणाकणाने व क्षणाक्षणाला केलेला त्याग असे ह्या प्रवासाचे विद्ध विद्ध करणारे स्वरूप होते. इंग्रजीत नेहमी प्रश्नरूपाने असे म्हणतात– Can the leopard change its spots? इथे ह्या 'चित्त्या'ला आपले स्पॉट्स्च काय सगळी कातडी बदलावी लागली. तो चित्ता राहिलाच नाही. चित्त झाला.

ज्याला सामान्यपणे चमत्कार म्हणतात, तसे ह्या पुस्तकातही आहेत. पण त्यांचे स्वरूप भाकडकथांसारखे नाही. त्याचप्रमाणे ज्यांना आपण एका झटक्यात भ्रम किंवा अंधविश्वास किंवा कांहीतरी काल्पनिक असे म्हणून बाजूला सारू अशा अनेक घटना या पुस्तकात आहेत. पण त्यांना तसे बाजूला डावलण्याची हिंमत होत नाही. बुद्धीच्या कसोटीवर त्यांना अजूनही उडवून लावता येईल. पण बुद्धीची कसोटी लावणेच बरोबर वाटेनासे होते. कारण पुस्तक वाचता वाचता एक नवीनच जाणीव मूळ धरू लागते. ती म्हणजे मानवी जीवन व हे विश्व म्हणजे केवळ एका संस्कृतीने दिलेले 'दर्शन' नव्हे. प्रत्येक संस्कृती आपले स्वतःचे असे 'ज्ञान' सादर करीत असते. हे 'आकलन' म्हणजे खऱ्या ज्ञानतृष्णेच्या संदर्भात केवळ एका थेंबासारखे ठरते.

त्याचबरोबर दुसरीही एक गोष्ट सतत जाणवत राहते. ती म्हणजे जीवनाच्या भारतीय आकलनाशी असलेले ह्या दर्शनाचे साम्य. पण तो स्वतंत्र लेखाचा विषय आहे. त्याकरता जिज्ञासूंनी पुस्तक मुळातूनच पाहायला हवे. पण ह्या पुस्तकाचे खरे महत्त्व निराळे आहे. एका दुर्लक्षित पुरातन संस्कृतीतील मानस-विश्वाचा हा फार साक्षेपी व जिवंत आराखडा आहे. गुरु-शिष्य संवादातून उलगडत गेलेला सारा प्रवास लेखकाने एका अपूर्व सावधपणाने टिपलेला आहे. पुस्तक एकाद्या कादंबरी– इतके वेधक, नाटकासारखे उत्कंठा वाढविणारे आणि निरागस, साध्या, ओघवत्या शैलीत लिहिलेले आहे.

---

'प्राज्ञ' प्रकाशन :

# ज्ञानदेव चिंतन

संपादक :

**डॉ० वसंत स० जोशी**

प्रस्तावना :

तर्कतीर्थ **लक्ष्मणशास्त्री जोशी**

मूल्य वीस रुपये.

लिहा :

**चिटणीस, प्राज्ञ पाठशाळामंडळ, वाई**






राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अ. भि. शाह अनु०– मीरा भागवत

# पंडिता रमाबाई : प्रस्तावना

[ महाराष्ट्र राज्य साहित्य– संस्कृति मंडळातर्फे प्रकाशित झालेल्या 'Letters and Correspondence of Pandita Ramabai' ह्या प्रा. अ. भि. शाह यांनी संपादित केलेल्या इंग्रजी ग्रंथास त्यांची प्रस्तावना असून तिचा मराठी अनुवाद ( पूर्वार्ध ) येथे मंडळाच्या अनुमतीने दिला आहे. उत्तरार्ध जून, ७८ च्या अंकात प्रसिद्ध होईल. – का. सं. ]

आधुनिक भारताने निर्माण केलेल्या स्त्रियांमध्ये पंडिता रमाबाई सरस्वती ( १८५८-१९२२ ) या सर्वश्रेष्ठ होत. 'सर्वश्रेष्ठ भारतीय' म्हणून इतिहासाने नोंद घेतलेल्यांमध्ये त्यांचा समावेश आहे. आज त्यांच्या उदयाला जवळजवळ एक शतक लोटून गेले आहे. तरी स्त्रियांच्या हक्कासाठी झगडणाऱ्या एक अग्रणी म्हणून त्यांचे कर्तृत्व व स्त्रीशिक्षण आणि समाजसुधारणा या क्षेत्रात एक पाईक म्हणून त्यांनी केलेली कामगिरी यांस आजही तोड नाही. त्या संस्कृत विदुषी होत्या, वयाच्या विसाव्या वर्षी कलकत्त्याच्या शास्त्रीवृंदांकडून 'पंडिता' या बिरुदाने त्यांचा जाहीरपणे बहुमान केला गेला होता; हिंदूची विद्येची देवता सरस्वती हिचा आधुनिक अवतार म्हणून त्याना गौरवले गेले होते. भारतात किंडरगार्टन शिक्षणपद्धतीचा परिचय करून देणाऱ्या त्या जशा पहिल्या तशाच शालेय शिक्षणाला भारतात व्यावसायिक वळण देणाऱ्याही त्या पहिल्या. या सर्वांहून महत्त्वाचे म्हणजे हिंदू समाजात स्त्रियांवर लादल्या गेलेल्या अमानुष गुलामगिरीविरुद्ध बंड पुकारणाऱ्या आणि स्त्रीमुक्तीच्या चळवळीचे बीजारोपण करणाऱ्या पहिल्या त्याच होत, आणि या सर्व कार्यांत आपल्या स्वतःच्या आंतरिक कल्पनांवर व साधनांवरच त्या प्रामुख्याने विसंबून राहात. त्यांनी तशी सर्व जगाची मदत स्वीकारली इतकेच नव्हे तर साहाय्यार्थ जगभर हातही पसरले; परंतु कोणास खूष करण्यासाठी स्वतःच्या तत्त्वांशी तडजोड मात्र कदापि केली नाही.

रमाबाईंच्या जीवनाचे साहजिकपणे चार कालखंड पडतात. पहिला १८५८ पासून तो त्यांनी इंग्लंडला प्रयाण करीपर्यंत, म्हणजेच १८८२ पर्यंतचा. हा कालखंड सर्वांहून अधिक बिकट, तसाच त्यांच्या कल्पना, त्यांची जडणघडण या दृष्टीने अत्यंत महत्त्वाचा. या काळानेच त्यांच्या भावी जीवनाची आणि कार्याची दिशा ठरवली. वयाच्या केवळ सहाव्या महिन्यापासून अत्यंत खडतर अशा जीवनशिक्षणाला त्यांनी प्रारंभ केला तो याच कालखंडात, रमाबाईंचे वडील अनंतशास्त्री डोंगरे हे विख्यात पंडित व 'सनातनी सुधारक' होते. स्त्रीशिक्षणावर त्यांचा विश्वास होता. प्रस्तुत पुस्तकात रमाबाईंनी केलेल्या आत्मवृत्तपर चित्रणातील ( पृ. १५ ) कांही भागांत व त्यानंतर लिहून १९०७ मध्ये प्रकाशित केलेल्या 'Testimony' या ग्रंथात आपल्या वडिलांनी ब्रह्मवृंदांच्या श्रद्धांधकाराशी केलेल्या संग्रामाची वीरगाथा रमाबाईंनी चित्रित केली आहे, स्त्रियाना संस्कृत शिकविण्याविरुद्ध वेद व उपनिषदे याखेरीज अन्य हिंदू ग्रंथांतून, कोठेही शास्त्राधार न मिळाल्यामुळे समकालीन परंपरावादी मंडळींचा कडवा विरोध पतकरूनही त्यांनी रमाबाईंच्या मातोश्रींना संस्कृत शिकविण्यास सुरवात केली. रमाबाई हे घरातील सर्वांत धाकटे अपत्य, या कुटुंबाच्या अखंड भ्रमंतीच्या

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

कालावधीत त्यांच्या मातेने त्यांचे शिक्षण केले. वयाच्या अवघ्या सोळाव्या वर्षी त्याना मातृपितृ-वियोग घडून आला, तसेच त्याचवेळी त्यांच्या ज्येष्ठ भगिनीचाही वियोग झाला. त्यांचे वडील बंधू श्रीनिवास यांचा १८८० मध्ये मृत्यू होईपर्यंत या दोन भावंडानींच आपली परिक्रमा पुढे चालू ठेवली.

बंधू हयात होते तोवर आपल्या विवाहाचा विचार रमाबाईंच्या मनांत आला नाही; त्यांच्या मृत्यूनंतर मात्र या जगात त्या पूर्णतया एकाकी राहिल्या त्यामुळे बिपिन बिहारीदास मेधावी या सुशिक्षित कायस्थाबरोबर त्या जून १८८० मध्ये विवाहबद्ध झाल्या. मेधावी हे श्रीनिवासाचे स्नेही होते तसेच रमाबाईंचे चाहते होते. एप्रिल १८८१ मध्ये त्यांची कन्या मनोरमा हिचा जन्म झाला आणि रमाबाईंना जीवनात प्रथमच कुटुंबसौख्य अनुभवायला मिळाले. आपले पती व कन्या यांची देखभाल करण्यात रमाबाई संतुष्ट राहिल्या असत्या. स्त्रीशिक्षणकार्यातही त्या तत्पर राहिल्या असत्या यात संदेह नाही; त्यासाठी एखादी शिक्षणसंस्थाही त्यानी काढली असती. मात्र या साऱ्यांचे स्वरूप हे पश्चिम भारतात आणि बंगालमध्ये समाजसुधारकांनी सुरू केलेल्या 'रिकामपणच्या कामगिरी'सारखे राहिले असते. एवढयाने त्या जोतिराव फुले (१८२७–१८९०) यांच्या सारख्याच्या पंक्तीला जाऊन बसल्या नसत्या. स्त्रियांना या लोकी स्वातंत्र्य, समता किंवा पारलौकिक मुक्ती याचा अधिकार लाभू न देणाऱ्या या समाजात त्याना स्त्री–हक्क चळवळीच्या सर्वश्रेष्ठ पाईक म्हणून बिरूदही मिळाले नसते.

रमाबाईंचे पती महामारीच्या अल्पकालीन दुखण्याने फेब्रुवारी १८८२ मध्ये मरण पावले. पुन्हा एकदा त्या अगदी एकाकी अशा राहिल्या. परंतु आता त्यांच्यावर जबाबदारी पडलेली होती–आपल्या दहा महिन्याच्या अल्पवयीन कन्येचे स्नेहहीन जगांत संगोपन करण्याची. तेव्हा रमाबाईंनी आपले उर्वरित आयुष्य स्त्रियांच्या उद्धाराकारणी लावण्याचा निश्चय केला. यासाठी एप्रिल १८८२ मध्ये महाराष्ट्रात परत आल्या. येथे सुधारक मंडळीनी त्यांचे उत्साहाने स्वागत केले. त्यांच्यासाठी अनेक सभा आयोजित करण्यात आल्या. त्यात स्त्रीशिक्षणाचे महत्व आणि जीवनात स्वातंत्र्य व प्रतिष्ठा मिळवण्याचा स्त्रियांचा हक्क यावर रमाबाईंची व्याख्याने झाली. हंटर आयोगापुढे त्यांनी साक्ष दिली. तीत स्त्रीशिक्षक व स्त्रीडॉक्टर यांच्या आवश्यकतेवर त्यांनी भर दिला. स्त्रीडॉक्टरांबाबत सूचना हा हंटर आयोगाच्या कक्षेबाहेरचा विषय होता. परंतु व्हिक्टोरिया राणीचे लक्ष त्या सूचनेकडे वेधले आणि 'भारतीय महिला वैद्यकीय सहाय्यार्थ राष्ट्रीय समितीची' (National Association for Supplying Female Medical aid to women of India) निर्मिती झाली. हिलाच 'डफरिन चळवळ' (Countess of Dufferin Movement) असे नाव मिळाले. १८८५ मध्ये व्हाइसरॉय डफरिनच्या पत्नीने तिचे उद्‌घाटन केले.

आपण स्वतः वैद्यकीय शिक्षण घेतल्याशिवाय आपल्याला भारतीय महिलाना योग्यप्रकारे सहाय्य करता येणार नाही, अशा निर्णयापर्यंत लौकरच रमाबाई आल्या. परंतु भारतात मद्रासखेरीज इतरत्र स्त्रियांच्या वैद्यकीय शिक्षणाची सोय नव्हती आणि मद्रासला जी होती तीसुद्धा फारशा वरच्या दर्जाची नव्हती. त्यामुळे इंग्लंडला जाण्याच्या शक्याशक्यतेचा रमाबाईंनी शोध घेण्यास सुरवात केली. 'कम्युनिटी ऑफ सेंट मेरी दि व्हर्जिन (CSMV), वॉन्टेज– इंग्लंड या संस्थेच्या पुण्यातील कार्यकर्त्या 'सिस्टर्स'नी रमाबाईंना जरूर ती सर्व मदत देऊ केली आणि अशाप्रकारे या असामान्य स्त्रीच्या जीवनातील एका नवीन व महत्त्वाच्या पर्वास प्रारंभ झाला.

रमाबाईंना सहाय्य हवे होते परंतु त्यांचा स्वाभिमान धर्मादाय मदत स्वीकारण्याआड येत होता. पूर्वकालातही डोंगरे मंडळींनी आपल्या भ्रमंतीमध्ये भिक्षेऐवजी उपासमार पतकरली होती. रमाबाईंनी 'स्त्रीधर्मनीति' या नावाचे एक मराठी पुस्तक लिहिले. या पुस्तकाच्या विक्रीतून जमलेल्या रकमेमधून त्यांनी आपला व आपल्या कन्येचा प्रवासखर्च भागवला. csmv मधील ज्या सिस्टर्स पुण्यास कामासाठी येत असत त्यांना मराठी शिकवण्याचे काम पतकरून त्यांनी आपला इंग्लंडमधील खर्च भागवला. पुढे 'चेल्टनहॅम लेडीज कॉलेज'मधे शिकत असताना त्यांनी तेथील विद्यार्थिनींना संस्कृत शिकवून आपल्या खर्चाची अशाप्रकारे तरतूद केली.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अमेरिकेतील त्यांच्या वास्तवकाळात 'द हायकास्ट हिंदू वूमन' या त्यांच्या पुस्तकाच्या विक्रीतून मिळणाऱ्या नफ्यामध्ये त्यांचा खर्च निभावून गेला.

दि. २० एप्रिल १८८३ रोजी रमाबाई इंग्लंडला जाण्यासाठी निघाल्या व दि. १७ मे १८८३ त्या तेथे पोहोचल्या. भारत सोडतेवेळी ख्रिस्ती धर्म स्वीकारण्याचा त्यांचा हेतू नव्हता. इतकेच नव्हे तर आपण तसे कधीही करणार नाही असे त्यांनी जाहीरसुद्धा केले होते. पण हिंदू धर्माबाबत त्यांनी कुठला भ्रमही बाळगलेला नव्हता. पुण्यात गत-भर्तृकांकरता सदन सुरू करण्यापूर्वी त्यांच्या बेताना समाजाकडून जो थंडा प्रतिसाद मिळाला त्याने त्यांची घोर निराशा झालेली होती. हिंदू धर्माच्या तेजस्वी तत्त्वज्ञानाचा त्यांना परिचय होता तशी त्याची विकृतबाजूही– विशेषतः त्यांच्यावेळी समाजाच्या आचरणात असणारी– त्यांना परिचित होती. ताजमहालला भेट देऊन आल्यावर त्या संगमरवरी काव्यामागील भयानकतेचे वर्णन केल्या-नंतर त्या हिंदू धर्माकडे वळतात. स्त्रियांबाबतच्या अमानुष व कुटिल वृत्तीचा त्या कडाडून निषेध करतात. त्या म्हणतात– (पृ. ३१२–३१४)

'माझ्या पाश्चिमात्य भगिनींना माझी विनवणी आहे की आमच्या पुरुषवर्गाच्या महान तत्त्वज्ञानाच्या बाह्य सौंदर्याकडे पाहून त्यांनी संतुष्ट राहू नये किंवा सुशिक्षितांच्या प्रदीर्घ व रंजक चर्चांनी भुलून जाऊ नये. तर प्राचीन हिंदु प्रज्ञावंतांच्या भव्य स्मारकांची गुप्त द्वारे खोलून तेथील अंधाऱ्या तळघरात प्रवेश करावा. ज्या तत्त्वज्ञानाचे आपण येवढे गोडवे गातो त्याच्या प्रात्यक्षिकाचे यथातथ्य दर्शन तेथे त्यांना घडेल. हिंदुत्वाचे बालेकिल्ले आणि ज्ञानपीठे असलेल्या जगन्नाथपुरी, बनारस, गया, अलाहाबाद, मथुरा, वृंदावन, द्वारका, पंढरपूर, उडिपी, तिरुपती आणि अशाच इतर तीर्थक्षेत्रांच्या ठिकाणी, जेथे साधुपुरुष व महात्मे यांचे वास्तव्य आहे, जेथे उदात्त तत्त्वज्ञानाची प्रतिदिनी संथा दिली जाते आणि भक्तिभावाने ती ग्रहण केली जाते अशा शेकडो तीर्थक्षेत्री आमचे प्राश्चात्त्य सुहृद्जन वारंवार जाऊ द्यात; त्याठिकाणी सहस्रावधी लोक असे आहेत की ज्यांनी वैदिक विद्येचे अध्ययन केलेले आहे, जे आम्हा लोकांचे मार्गदर्शक आहेत, अध्यात्मिक क्षेत्रातले शास्ते आहेत. गतभर्तृकांची ते उपेक्षा करतात......शेकडो, हजारो तरुण विधवा तीर्थक्षेत्री जमवून त्यांच्या संपत्तीचे आणि शीलाचे अपहरण-करण्याच्या हेतूने ते आपले शेकडो हस्तक तरुण गतधवांच्या शोधार्थ बाहेर पसरवतात......या देशात सहस्रावधी तरुण विधवा व निष्पाप बालके अस्फुट दुःखे भोगताहेत, आणि प्रतिवर्षी निराधारपणे मृत्युमुखी पडताहेत. परंतु त्यांच्या सहाय्यार्थ आणि रक्षणार्थ एकही तत्त्वज्ञ किंवा महात्मा धैर्याने पुढे सरसावलेला नाही ...... आपण स्वतंत्र स्त्री आहो असे प्रकटपणे व्यक्त करण्याचे आणि आपल्या स्वतःच्या विवेक-बुद्धीला अनुसरून चालण्याचे धैर्य दाख-वणाऱ्या मूठभर स्त्रियांकरता आमचे विद्यासंपन्न पुरुष, व्युत्पन्न धर्मगुरु आक्रोश करताहेत. परंतु प्रतिवर्षी मृत्युमुखी पडणाऱ्या किंवा लाजिरवाणे जिणे जगणाऱ्या हजारो स्त्रियांबद्दल मात्र ते अवाक्षरही काढीत नाहीत . . . आपल्या वाचनात येणारे ग्रंथ आणि काव्य यावर माझ्या पाश्चात्त्य भगिनींनी लुब्ध होऊन राहु नये– याहून फारच खडतर व कटू वस्तुस्थिति आम्हाला पतकरावी लागते, भोगावी लागते, आमच्या-कडे सर्वच काही काव्य नाही, आमच्या जीवनात आम्हाला वाचावे लागणारे गद्य हे अत्यंत दुर्बोध आहे. आमचा व्युत्पन्न बंधु-वर्ग आणि आमच्या सुखवस्तू पाश्चात्त्य भगिनी यांना त्याचे आकलनही होणार नाही.

हे लिहिले आहे १८९६ मध्ये. परंतु सनातनी उच्चवर्णीय हिंदूची हृदयशून्यता आणि विद्यासंप-न्नांची दांभिकता व क्षुद्र मनोवृत्ती यांचा रमा-बाईंना बालपणापासून परिचय होता. त्यांच्या बाप्तिस्म्यानंतर लगेच त्यांनी लिहिलेल्या त्यांच्या इंग्लंड सफरीच्या वृत्तांतांत त्या सांगतात, की दुसरा



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

बाजीराव (ज्याची प्रथमपत्नी ही रमाबाईच्या आईची लांबची बहीण होती) याने वयाची साठी ओलांडली असता व अंधत्व आले असता दहा वर्षे वयाच्या मुलीशी विवाह केला होता. दुसऱ्या एका पासष्ट वर्षे वयाच्या वृद्धाने एका मनुष्यास तीस हजार रुपये देऊन त्याच्या अकरा वर्षे वयाच्या मुलीशी लग्न केले होते. या पुस्तकात समाविष्ट असलेल्या काही पत्रांतून यांसारखी असंख्य उदाहरणे रमाबाईंनी कथन केलेली आहेत ). पृ. १७६–१७८, २८० पासून, २९०–२९२ )

रमाबाईंच्या काळी उच्चवर्णीय हिंदू स्त्रियांची दु:स्थिती तर होतीच, परंतु रमाबाईंना अधिक राग कोणाचा येत असे तो या स्त्रियांकरिता विपुल अश्रुविमोचन करणाऱ्यांच्या निष्क्रियतेचा. वयाची अठरा वर्षे पूर्ण होण्यापूर्वी बालविधवांचे केशवपन करणे किंवा त्यानंतरही पंच अथवा मॅजिस्ट्रेट यांच्या समक्ष त्या विधवेची लेखी अनुमती नोंदविल्यावाचून तिला अशाप्रकारे विद्रूप करणे हा गुन्हा ठरविला जाऊन त्याला कायद्याने बंदी केली जावी, अशा प्रकारचे आवाहन शासनाला करणाऱ्या सी. सुब्रह्मण्यम् अय्यर यांच्या ठरावास पाठिंबा देणारे भाषण रमाबाईंनी मुंबईला १८८९ मध्ये भरलेल्या इंडियन नॅशनल सोशल कॉन्फरन्सच्या तिसऱ्या अधिवेशनामध्ये केले. आपल्या भाषणाच्या ओघामध्ये त्यांनी म्हटले की "समाजावरचा हा कलंक दूर झाला पाहिजे असे ज्यांना वाटतच नाही त्यांच्याशी आपण भांडण करणार नाही; परंतु एकदा ठराव– विधवांना विद्रूप न करण्याचा केला म्हणजे मग मात्र त्याला चिकटून राहिलेच पाहिजे हे ठसविण्याचा आपला हेतू आहे." रमाबाई या हिंदू समाजापासून दुरावण्यास धर्ममार्तंडांची अमानुषता जशी कारणीभूत होती तशीच सुशिक्षित हिंदूंची उक्ती व त्यांचे भ्याड आचरण यांमधील तफावत हीही कारणीभूत होती.

१८८२ मध्ये, पुण्यास येण्याच्या पुष्कळ आधीपासून रमाबाईंचा आपल्या पूर्वजांच्या धर्मावरील विश्वास उडालेला होता. काही काळ त्यांना असे वाटले की या श्रद्धांचे स्थान ब्राह्मो तत्त्व घेऊ शकेल. केशवचंद्र सेन यांच्या उदाहरणाने त्यानी वेदांचा अभ्यास करण्यास स्त्रिया पात्र नाहीत ही कल्पना दूर सारून त्यांनी उपनिषदे, वेद व वेदान्त यांचा अभ्यास सुरू केला. परंतु या वाचनाने त्यांच्या मनातील असंतोष वाढतच गेला, ब्राह्मो श्रद्धांमधील संकलनवादी दृष्टी परंतु प्रत्यक्षात मात्र त्यानुसार धर्माचरण करण्याबद्दल त्यांची नाखुषी या वस्तुस्थितीशी त्या तडजोड करू शकल्या नाहीत, त्यांना हव्या असलेल्या प्रकारची श्रद्धा त्याना ख्रिस्ती धर्मात उपलब्ध होऊ शकली. ख्रिस्ती धर्मसंकल्पनेमधील व्यक्तिगत ईश्वर व त्याचे प्रेमस्वरूप यांनी त्यांच्या मनावर विशेष ठसा उमटवला. समाजाने पतित व बहिष्कृत मानलेल्या स्त्रियांमध्ये कार्य करताना ख्रिस्ती परिव्राजिका दाखवित असलेल्या आत्मसमर्पणाच्या वृत्तीनेही रमाबाई तितक्याच प्रभावित झाल्या. २९ सप्टेंबर १८८३ रोजी रमाबाईंनी मनोरमेसह स्वखुशीने ख्रिस्ती धर्माची दीक्षा घेतली आणि सिस्टर जेरल्डीन यांच्या धर्ममाता झाल्या.

सिस्टर जेरील्डीन यांनी सुमारे तीस वर्षांहून अधिक काळ सांभाळून ठेवलेल्या साहित्यातून निवडून काढलेल्या पत्रांचा प्रस्तुत ग्रंथांत समावेश केलेला आहे, या साहित्याचे महत्त्व जाणून त्या म्हणतात :

> "प्रस्तुत पत्रव्यवहार वाचून पाहता मला असे जाणवले, की ही नुसतीच पत्रे नव्हेत (कारण याबरोबर अनेक संवाद, अपूर्व दैवयोग यांच्या स्मृती माझ्यापुढे सुस्पष्टपणे उभ्या ठाकत आहेत), तर माझ्यापाशी हा एक अपूर्व ठेवा आहे. ज्या गोष्टी मला एकटीलाच ज्ञात आहेत त्या माझ्या स्वत:शिवाय अन्य कोणास लिहिता येणे अशक्य आहे. आणि माझे हे ज्ञानभांडार इतरास उपयुक्त होईल अशा स्वरूपातच त्यांच्यापुढे खुले करण्याची मी पराकाष्ठा केली पाहिजे यात शंका नाही. याला कांही वाङ्मयीन माहात्म्य द्यावे अशी माझी इच्छा नव्हती. फक्त या साहित्याची पद्धतशीर व यथाक्रम मांडणी करावयाची, आणि घटना, प्रसंग, व्यक्ती आणि अनुक्रम यांचे माझ्या शक्त्यनुसार जरूर तेथें निरुपण करावयाचे इतकेच."

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

भारतातील ख्रिस्ती लेखकांनी लिहिलेल्या पंडिताबाईंच्या बहुतेक चरित्रांपेक्षा सिस्टर जेरल्डीनचे वेगळेपण म्हणजे एक परिपूर्ण व्यक्ती असे रमाबाईंचे चित्र त्यांनी उभे केलेले नाहीं. 'ज्या चरित्रलेखनात संबंधित व्यक्तीचे दोष झाकून ठेवलेले नसतात अशीच चरित्रेही अत्यंत हृदयंगम असतात आणि स्फूर्तिदायक असतात असे मला आढळून आले आहे, असे त्या म्हणतात 'दोष दडपून ठेवून लिहिलेले चरित्र हे नेत्रदीपक भासले, तरी औदासिन्य निर्माण करते. या उलट वस्तुस्थिति कथन करीत जाणारे चरित्र हे चैतन्यपूर्ण व उत्साहजनक असते. या विचारांशी प्रामाणिक राहून सिस्टर जेरल्डीन यांनी रमाबाईंच्या स्वभावामधील गुणांप्रमाणे अवगुणांचाही मुक्तपणे उलेख केलेला आहे. उदा. जानेवारी १८८६ मध्ये डोरोथिया बील यांना लिहिलेल्या पत्रात सिस्टर जेरल्डीन म्हणतात (पृ. ११४)

> 'तिने ज्या अडचणी पुढे मांडल्या आहेत त्यांत प्रांजळपणा व कळकळ यांचा अभाव आहे. ज्यामध्ये उच्चतर प्रतीच्या नैतिक आणि आत्मिक परिपूर्णतेची जरूरी आहे अशा तऱ्हेचे धर्माचे सिद्ध, सत्यस्वरूप ती स्वीकारीत नाही, तर जो धर्म ती स्वखुषीने स्वीकारते आहे, जो तिच्यामते तिच्या देशभगिनींच्या बुद्धीला पटण्याजोगा आहे, त्यांना सहजपणे पतकरण्याजोगा आहे त्या धर्माला खरोखर ख्रिस्ती धर्म हे नाव तरी देता येईल किंवा नाही याची मला शंका आहे.'

हा आरोप गंभीर स्वरूपाचा आहे. विशेषतः धर्मासारख्या उदात्त बाबीचा त्यात समावेश असल्यामुळे. परंतु याहून अधिक गंभीर स्वरूपाचा आरोप सिस्टर जेरल्डीनने रमाबाईंवर केलेला आहे. तो म्हणजे काही विशिष्ट प्रसंगी असत्य भाषण करण्यास रमाबाई कचरत नसत. मिस बीलना लिहिलेल्या त्याच पत्रात सिस्टर जेरल्डीन म्हणतात :

> 'सर्वसाधारण हिंदूपेक्षा ती वेगळी आहे असे मला काही वेळा वाटते. सत्यभाषण हा जो तिच्या देशभगिनींच्या स्वभावाचा विशेष पैलू आहे त्याला ती अपवाद आहे. या सद्गुणाला ती पारखी आहे असे तिने, शब्दशः आणि अक्षरशः सिद्ध केले आहे.'



रमाबाईंनी इंग्लंड सोडल्याला नऊ वर्षे उलटून गेल्यावरही सिस्टर जेरल्डीनचे त्यांच्याबद्दल जे मत होते त्याबद्दल आश्चर्य वाटायला नको. त्या म्हणतात, 'ज्या अहंकाराने आणि हटवादीपणाने चर्चमधील धर्मगुरुविरुद्ध तू आपली मते बनवलीस तोच अहंकार आणि हटवादीपणा हा अजून आजमितीला तुझा स्वभावविशेष आहे' (पृ. ३३९) रमाबाई व त्यांची धर्ममाता यांच्यात जो वाद चालू होता त्याची अध्यात्मिक बाजू आपण नंतर पाहू. तूर्त इतकेच ध्यानात घेतले तरी पुरे, की या दोघीमध्ये आत्यंतिक स्नेहभाव जरी होता आणि रमाबाईंच्या मनात सिस्टर जेरल्डीन व इतर सिस्टर्सबद्दल सतत कृतज्ञबुद्धी होती, तरी रमाबाईंचे मन हे कमालीचे स्वतंत्र होते– कोठल्याही साचेबंदपणामध्ये ते सामावू शकत नव्हते. त्याबरोबरच प्रतिकूल परिस्थितीशी टक्कर देण्याजोगे असामान्य धैर्य त्यांच्यात असले, तरी स्वभावात भिडस्तपणा होता. त्यामुळे श्रोत्यांच्या सहानुभूतीची खात्री असल्याशिवाय त्या आपले मन उघड करून बोलत नसत. सिस्टर जेरल्डीन व रमाबाईंना त्यांच्या अडचणीतून मुक्त करण्याकरिता त्यांनी ज्यांच्याकडे पाठवले ते फादर्स यांच्या संप्रदायनिष्ठ दर्पामुळे यांच्यातील परस्परांतील विचारांच्या देवाणघेवाणीची समस्या अधिकच बिकट झाली... सिस्टर जेरल्डीनच्या या संग्रहाचे महत्त्व त्यांना स्वतःला जाणवते त्यापेक्षा जास्त आहे. रमाबाई अथवा मनोरमा यांच्या भावी चरित्रकारांना हा संग्रह उपयुक्त ठरावा; मिशनरी कार्यकर्ते व त्यांच्या कार्यपद्धती यातील दोष स्पष्ट व्हावे; आणि 'भारतीय मनाचा वेध घेणारे मनोवैज्ञानिक आणि अध्यात्म शास्त्रज्ञ' यांनाही यापासून काही हातभार लागावा अशी त्यांची अपेक्षा होती (पृ. ३) हे सर्व यातून साध्य होईल यात शंकाच नाही; पण आधुनिक वाचकाला याहूनही अधिक स्वारस्य वाटेल अशा अनेक बाबी यात असल्याने हा ग्रंथ तितकाच महत्त्वाचा वाटेल.

रमाबाईंची पत्रे ही त्यांच्या सुसंस्कृत, संस्कारक्षम व सहृदय अशा मनाचा साक्षात्कार घडवतात.....

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

की जे मन आपले विचारस्वातंत्र्य, भाषास्वातंत्र्य हे अनमोल मानते. एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धातील हिंदू समाजाच्या परिस्थितीबद्दल बहुमोल माहिती या पत्रांतून मिळते तसे त्या काळातून उदारमतवादी समाजसुधारकांच्या मनाचा ठाव या पत्रातून लागू शकतो. त्याचबरोबर पाश्चात्य–संस्कृती व ख्रिस्ती धर्म यांच्या संमिश्रणाने उभ्या राहिलेल्या आव्हानाला परकीय सत्तेखाली असता तोंड देणारे उदारमतवादी तसेच पुराण-मतवादी सुशिक्षित हिंदू यांच्या समस्यांचे सखोल दर्शनही येथे घडते.

कर्नाटकामधील आपल्या वडिलार्जित वास्तूला दिलेल्या भेटीच्या वर्णनात रमाबाई सिस्टर जेरल्डीनना लिहितात : ( पृ. २५२–२५३ )

"आमचे घर ज्यावर बांधलेले आहे ते पठार अंदाजे एक मैल क्षेत्रफळाचे आहे. येथून एक मैलभर उंचीवर उगम पावणाऱ्या तुंगा नदीचा बालप्रवाह येथून दिसतो. पूर्वी जेथे आमचे घर होते त्या जागेला वळसे घालीत तिचा प्रवाह चालू होतो. नदीतीर हे रमणीय अशा नेच्यांनी सुशोभित आहे– तेथे सुमारे वीस विविध प्रकारचे नेचे आढळतात. ओबडधोबड खडकामधून तुंगेचे शीतमधुर व स्फटिकासारखे निर्मळ पाणी झुळझुळत असते. लहानमोठ्या वृक्षांच्या शोभायमान शाखा आणि कमनीयपणे झुकलेले नेचे हे जणू त्या ओढ्याचे सूर्यकिरणांपासून संरक्षण करतात. माझ्या प्रिय मातेने आपल्या हाताने ( सुमारे तीस वर्षांपूर्वी ) लावलेली चाफा, गुलाब वगैरे तिची लाडकी फुलझाडे अजूनही तुंगेच्या तीरावर दिसताहेत. ही सारी भूमीच माझ्या प्रिय मातापित्यांच्या साहचर्याने पूजनीय झालेली आहे. या ठिकाणी वर्तुळाकार वितानाप्रमाणे भासणाऱ्या, विमल-नील गगनाइतके रमणीय नभोमंडळ आजवर इतरत्र कोठे मी पाहिलेले नाही ... ... ... समुद्रकाठच्या वालुकणाप्रमाणे असंख्य लुक-लुकणाऱ्या तारकांनी व्यापलेले आकाश इथून अलौकिक दिसते. रात्री नऊच्या सुमारास दक्षिणबाजूस अद्‌भूत त्रिशंकू नक्षत्राचा उदय होतो, तर मध्यरात्री शोभायमान वृश्चिक राशीने पूर्वाकाश व्यापले जाते. दिवसा पश्चिमबाजूस सुमारे साठ मैलपर्यंत मैदान विस्तारलेले दिसते– स्वच्छ दिवस असेल तेव्हा पश्चिमेस छत्तीस मैलावर सूर्यप्रकाशात तळपणारा समुद्र काचेप्रमाणे दिसतो. आजवर माझ्या दृष्टीस पडलेल्या कोणत्याही स्थळापेक्षा या प्रदेशाचे सृष्टिवैभव व रमणीयता श्रेष्ठ प्रकारची आहे परंतु प्रवासाच्या गैरसोयीमुळे हे सर्व दुष्प्राप्य आहे."

रमाबाई म्हणजे वृक्षराजीचे आणि पर्वतराजीचे एक बालकच. अमेरिकेतील ग्रँड कॅनिअनच्या दर्शनानंतर डोरोथिया बील यांना लिहिलेल्या पत्रातूनही त्यांचे हे सृष्टिप्रेम प्रकट होते ( पृ. १८३, २१६ ). पुण्यातील शारदासदनातही एक रम्य उद्यान होते आणि विविधप्रकारच्या फुलांतील रमणीयता, वैचित्र्य व उपयुक्तता रमाबाईंनी तेथील मुलींना विशद करून सांगितल्यावर त्या म्हणतात– 'एकही दिवस असा सुना गेला नाही, की ज्या दिवशी एखादे मूल हातात फूल घेऊन लडिवाळपणे नजर टाकीत माझ्याकडे आले नाही.' (पृ. २४२).

दीनदलितांविषयी रमाबाईंची सहानुभूतीही अंतःप्रेरणेतून असायची; त्यासाठी जातपातीची बंधने त्यांना ठाऊक नव्हती. त्यांनी स्वतः दारिद्र्याचे चटके अनुभवलेले होते. ज्याठिकाणी गाय ही मनुष्यापेक्षा पवित्र समजली जाते आणि जेथे या दोन्हीला दाखवलेली निर्दयता पूर्वकर्माच्या नावावर खपवली जाते अशा समाजात दारिद्र्याचा अर्थ काय, हेही त्या जाणून होत्या. यामुळे विधवा व निराश्रित स्त्रियांच्या साहाय्यार्थ ( csmv च्या धर्तीवर ) एक 'भगिनीसमाज' स्थापन करण्याची त्यांच्या मनात फार पूर्वीपासून १८८५ पासून इच्छा होती ( पृ. ९० ). निकट आप्त आनंदीबाई जोशी यांच्या वैद्यकीय पदवीग्रहणाच्या समारंभास उपस्थित रहाण्यासाठी त्या १८८६ च्या सुरवातीस अमेरिकेत गेल्या त्यावेळी त्यांच्या कल्पनाना मूर्तस्वरूप आले. आनंदीबाई जोशी या आधुनिक वैद्यक शास्त्राचा अभ्यास करणाऱ्या पहिल्या भारतीय महिला. रमाबाई


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

इंग्लंडला गेल्या त्यावेळी या फिलाडेल्फिया येथील वुइमेन्स मेडिकल कॉलेजमध्ये होत्या. पदवीदान-समारंभानंतर रमाबाई नोव्हेंबर १८८८ पर्यंत अमेरिकेत राहिल्या आणि संपूर्ण देश पायाखाली घालून अनेक सभातून त्यांनी 'भारतीय स्त्रियांची परिस्थिती' याविषयावर अनेक सभातून व्याख्याने दिली. याच कालावधीत १८८७ मध्ये त्यांचे 'द हायकास्ट हिंदू वुमन' हे पुस्तक प्रसिद्ध झाले. वर उल्लेखलेल्या वुइमेन्स मेडिकल कॉलेजच्या डीन डॉ. रेचेल बॉडले यांनी या पुस्तकास प्रस्तावना लिहिली असून तिची सुरवात खालील शब्दांनी केलेली आहे :

'हजारो वर्षांची मुग्धता आता लोप पावत आहे आणि या विनम्र छोटचा पुस्तकाच्या वाचका-पर्यंत एका अपरिचित आवाजातील प्रथमोद्‌गार येऊन आता पोहोचत आहे. अमेरिकेतील सज्ञान, सुशिक्षित सुखवस्तू स्त्रियांसमोर या उद्‌गारांची वेदनाकुल स्पंदने आज प्रकट होत आहेत.'. . . . 'द हायकास्ट हिंदू वूमनची ही कहाणी वाचावयास घ्यायची आणि अखेरच्या व्यथित विनवणीपर्यंत अंत:करणपूर्वक वाचीत न जाता तशीच ठेवून द्यायची म्हणजे स्वत:हून दैवी प्रकोप ओढवून घेण्यासारखे आहे– जो प्रकोप असहाय्यांच्या आक्रो-शाने धावून न जाणाऱ्याच्या वाटचास येत असतो! या शब्दपंक्ती भावनाकुलतेने ओथंबलेल्या आहेत. या पृष्ठावर ओघळणाऱ्या अश्रुधारानी माझी दृष्टि धूसर झाली आहे– इतके अतीव शोकाकुल अश्रू माझ्या डोळचानी आजवर कधी ढाळले नव्हते.'

डॉ. बॉडली यांनी उल्लेखलेली विनवणी ही या पुस्तकाच्या सातव्या–अखेरच्या–प्रकरणात आलेली आहे. यातील समारोपाच्या परिच्छेदात रमाबाई आपले हृदय ओततात आणि भारतात परतल्या-नंतर आपण हाती घेणार असलेल्या कार्याला हातभार लावण्यासाठी अमेरिकेतील लोकांना आवाहन करतात. त्या म्हणतात :

'मातानो आणि पित्यानो! तुमच्या घरांत शेकोटीच्या उबेला मजेत वावरणारी तुमची लाडकी बालकें आणि ज्यांचे एव्हाना दुष्ट सामाजिक रूढीच्या अपवित्र वेदीवर बलिदान झालेले आहे अशा त्याच वयाच्या हजारो भारतीय लहान बालिका यांची तुलना करून पहा! आणि मग तुमच्या मनाला विचारून पहा, की या लहानग्या बालविधवांना त्यांच्या छळवाद्यांच्या तावडीतून सोडविण्यासाठी तुम्ही कांहीच करू शकणार नाही का? भार-तातील अंत:पुरांच्या दगडी भिंतीआड लक्षा-वधी किंकाळचा दररोज उठत आहेत. मनाला दिलासा देणारा आशेचा एक किरणही न दिसता हजारो बालविधवा प्रतिवर्षी मृत्युमुखी पडत आहेत. आणखी काही सहस्र लज्जा आणि पाप याच्या भयानक रगाडचाखाली प्रत्यही झिरडून निघत आहेत – आणि त्यांचा हा सर्वनाश थोपवून त्यांना सन्मार्गावर आणायला तेथे कोणीही नाही!'

"या सर्व गोष्टींचा विचार करून, माझ्या देशभगिनींनो, हे पुस्तक वाचणारी तुमच्यातील प्रत्येकजण सहकार्याच्या प्रेरणेने भारावून जाऊन पुढे सरसावणार नाही काय? त्यांना या आमरण गुलामगिरीतून, नरकयातनांतून मुक्त करणार नाही का? आपल्या सहजीवी जनाबद्दल ज्यांना ज्यांना अगत्य आहे, करुणा आहे त्या सर्वांना माझी विनवणी आहे, की भारताच्या या कन्यकांचा धावा, कितीही जरी क्षीण आवाजात असला, तरी तुमच्या काना-पर्यंत पोहोचू द्या, तुमची हृदये हेलावू द्या. अमेरिकेतील सच्चा नागरिक बंधुभगिनींनो मी तुम्हाला आवाहन करेन, मानवतेच्या नावाने, माणुसकीच्या कार्यासाठी झटणाऱ्या तुम्हा सर्वांच्या पवित्र कर्तव्याच्या नावाने आणि या सर्वांहून अधिक म्हणजे परमेश्वराच्या अति पुण्यप्रद नावाने आपल्याला आवाहन करते, की जाती, वंश, देश यांचा विचार मनात न आणता आपण अत्यंत सत्वर आपला मदतीचा हात त्यांना द्यावा."

अमेरिकेत या पुस्तकाने प्रचंड आघात केला. रमाबाईंनी १८८८ मध्ये भारतात येण्याकरता अमेरिका सोडली. त्यापूर्वीच 'द हायकास्ट हिंदू वुमन'च्या १०,००० प्रतींची विक्री होऊन त्यांना रु २५,००० नफा झाला होता. डिसेंबर १८८७मध्ये



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

बोस्टन येथे 'रमाबाई असोसिअेशन' स्थापन करण्यात आली. जुलै १८८८ मध्ये अशाच प्रकारची 'रमाबाई असोसिअेशन ऑफ पॅसिफिक कोस्ट' ही स्थापन झाली आणि पहिल्या वर्षीच संस्थेला तिच्याकडून ५००० शिलिंगाची देणगी मिळाली. मे १८८८ पर्यंत रमाबाईंकडे ३०,००० शिलिंग गोळा झालेले होतेच आणि अमेरिका सोडण्यापूर्वी आणखी तितकीच रक्कम हाती येईल अशी त्यांची अपेक्षा होती. ( पृ. १८१ ) ८ ऑक्टोबर १८८८ मध्ये मिस डोरोथिया बील यांना लिहिलेल्या पत्रात त्या म्हणतात : ( पृ. १८२ )

> 'माझे काम विलक्षण वाढत चालले आहे. सध्या त्रेसष्टहून अधिक 'रमाबाई मंडळे' आहेत; माझ्या बालविधवागृहासाठी दरसाल अंदाजे ५,००० पौंड देणग्यांची आश्वासने मिळालेली आहेत. आणखी सुमारे ११,००० शिलिंगाची रक्कम नव्या इमारतीसाठी मिळणार आहे. नवीन इमारतीकरता आवश्यक असलेले आणखी १४,००० शिलिंग मिळवण्यासाठी माझी तूर्त इथे खटपट चालू आहे. ते इथे ( कॅलिफोर्नियात ) मिळवण्यात यश आले नाही, तर मला परत न्यूयॉर्कला जावे लागेल.'

फेब्रुवारी १८८९ मध्ये भारतात परतल्यावर रमाबाईंनी एका सभेत भाषण केले. ही सभा शेठ माधवदास रघुनाथदास यांनी बोलावलेली होती. अध्यक्षस्थानी आतमाराम पांडुरंग हे होते. बोलण्याच्या ओघात त्या म्हणाल्या :

> 'माझ्या प्रयत्नांस फळे येण्याची चिन्हे दिसू लागली ती अमेरिकेत, माझ्या सफरीमध्ये माझ्या भारतीय भगिनीकरता मी तीनशे सभांमधून व्याख्याने दिली आणि परदेशातील लोक करुणेने हेलावून गेले. अनेक अडचणी व मोठ्या गैरसोयी सोसून मी ३०,००० मैलांवर प्रदेश पायाखाली घातला आणि या कार्याकरता रु. ६०,००० उभे केले इतकेच नव्हे, तर यापुढे १० वर्षेपर्यंत दरसाल रु. १५,००० ची उदार देणगी देण्याचेही त्यांनी अभिवचन दिले आहे. याकरता बोस्टनमध्ये पद्धतशीरपणे एक मंडळ स्थापन झालेले असून, देशभर त्याच्या ६४ उपशाखाही सुरू झाल्या आहेत.'

शारदासदन हे मुंबईमध्ये ११ मार्च १८८९ मध्ये स्थापन झाले परंतु मुंबईच्या महागाईत खर्च परवडेनासा झाल्याने १८९० च्या अखेरीस ते पुण्यास हलविण्यात आले. पहिल्या दिवशी तेथे दोनच विद्यार्थिनी होत्या. त्यापैकी एक म्हणजे गोदूबाई नामक बालविधवा– एस्. एन्. डी. टी. विद्यापीठ व हिंदू–विधवा–गृह या संस्थांचे संस्थापक धों. के. कर्वे यांच्याशी पुढे त्यांचा पुनर्विवाह झाला. मे महिन्यापर्यंत ही संख्या १८ झाली. यापैकी बहुसंख्य ब्राह्मण समाजातील होत्या.

रमाबाई असोसिएशनच्या घटनेमध्ये स्पष्टपणे नमूद केलेले होते, की येथे पूर्णतया धर्मातीत शिक्षण दिले जाईल. ती शाळा अशी होती, की जेथे हिंदू किंवा ख्रिस्ती अशा कोणत्याच धर्माचे शिक्षण दिले जाणार नव्हते. रमाबाईंना याबाबत जे धोरण स्वीकारावयाचे होते त्याबद्दल 'द हायकास्ट हिंदू वूमन' च्या प्रस्तावनेत रेचेल बॉडली म्हणतात :

> 'हिंदू स्त्रियांकडे आपण हिंदू म्हणूनच पोहोचावे; धार्मिक श्रद्धांबाबत यांना पूर्ण स्वातंत्र्य द्यावे, पूर्ण मोकळीक द्यावी, 'बायबल' वाचण्याची अथवा ख्रिस्ती धर्माचा अभ्यास करण्याची अट घालू नये अशी त्यांची ( रमाबाईंची ) इच्छा आहे. त्याबरोबर असा विचार आहे की वाचनालयात 'बायबल' व इतर पौर्वात्य धर्मपुस्तके जवळ जवळ मांडून ठेवलेली असावी– आणि आपण देवापाशी अशी मनोभावे प्रार्थना करावी की त्याने या स्त्रियांना मुक्तीचा सत्यमार्ग दाखवावा ?

याचा असा मात्र अर्थ नव्हे की आपल्याला स्वतःला लाभलेल्या प्रकाशात आपल्या देशभगिनींना सहभागी करून घेण्यात रमाबाईंना काही स्वारस्य नव्हते. उलट त्यांच्या ज्या उद्गारांचे सूत्र पकडून पुढे लोकमान्य टिळकांनी आपल्या आक्रमक स्वभावानुसार त्यांच्या विरुद्ध टीकास्त्र परजले त्यात त्यांनी स्पष्टपणे म्हटले आहे की,

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

'भारतातील अंतःपुरांची कड्याकुलुपे मोडून-तोडून द्वारे खुली करणे हेच शुभ-वर्तमानप्रसाराचा मार्ग खुला करण्याच्या दिशेचे पहिले पाऊल होय. स्त्रियांना योग्य-प्रकारे शिक्षण दिल्याशिवाय ही गोष्ट असाध्य आहे......तेव्हा मगच त्यांना बाह्य जगाचा प्रखर लखलखाट आणि झंजावाताचा मारा सहन करण्याची ताकद येईल.

दुसऱ्या शब्दात मांडावयाचे म्हणजे रमाबाई विद्यार्थिनींना धर्मांतरास प्रत्यक्षपणे प्रवृत्त करणार नव्हत्या; परंतु शारदासदनात प्रवेश घेणाऱ्या या हिंदू मुली तेथून बाहेर पडताना ख्रिस्ती धर्म-प्रभावाच्या तडाख्यात न सापडता आल्या तशा चांगल्या हिंदू अशाच बाहेर पडाव्या असाही त्या मुद्दाम प्रयत्न करणार नव्हत्या.

---

प्रसिद्ध झाला

ज्ञानेश्वरीचा विशेष अर्थ सांगणारा बृहत् ग्रंथ

सार्थ श्रीज्ञानेश्वरी

संपादक व अनुवादक

म. शं. गोडबोले

किंमत ६० रुपये (पोष्ट खर्च ३॥ रुपये)

पृष्ठे डबल क्राऊन सुमारे एक हजार
पूर्ण कापडी बांधणी
उत्कृष्ट कागद
कल्पना मुद्रणालयाची मोहरेदार छपाई
श्रीज्ञानेश्वरीच्या सुमारे दहा हजार ओव्यांपैकी सहा हजार ओव्यांचा अर्थ स्वतंत्रपणे लावला आहे. ज्ञानेश्वरी अभ्यासकांपैकी अनेकजणांनी तो मान्यही केला आहे.

श्रीविद्या प्रकाशन,

शनिवार पेठ, अष्टभुजा मार्ग, पुणे ४११०३०









राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# ADVERTISEMENT

**Wanted Agents** (Male/Female)
**(Candidates do this work at own Area)**
**Salary Rs. 300/-, Commission and T. A. extra.**

**Qualification:- Candidate should be minimum Matric or Higher Secondary.**
**Age 18 to 40 yrs.**

**Send applications only in Hindi or in English. Registered Letter at following address:—**



**GWALIOR TEXTILES**
38-B, Majlis Park,
**DELHI-110 033.**


अनुक्रमणिका

मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

## ग्रंथ परीक्षण —

**' उत्थानगुंफा ': ( काव्यसंग्रह ) – यशवंत मनोहर; प्रबोधन प्रकाशन, ४२६ इकबाल बंगला, छावणी, औरंगाबाद; पृ. २४ + ८४, किंमत १० रु.**

गेल्या दशकात प्रतिभेच्या सामर्थ्याविषयी आम्ही स्वप्ने रंगवीत होतो. त्या वेळी केवळ जातिवंत दलित प्रतिभेलाच जे साधता येईल असे वाटत होते, ते पहाण्यात मन काहीसे उत्कंठितही झालेले होते. पण प्रत्यक्षात ज्या त्वरेने व उमाळचाने 'ते' समोर आले, त्यामुळे उत्कंठित मनही काहीसे हादरले. 'ते' प्रतिभारूप म्हणजे यशवंत मनोहरांची 'उत्थानगुंफा' होय.

उत्थानगुंफा ही स्फूर्ति, तुतारी, नवा शिपाई या केशवसुती काव्यांच्या वाचकांसाठी असलेली कविता आहे. ती 'विशाखा' च्या रसिकांसाठी आहे. ती 'ट्यिर्या अर्धपोटी जोवर आहेत। तोवर समस्त आम्ही नंगे' असे लिहिणाऱ्या मर्ढेकरी परंपरेची आहे. पण खरे तर, अशाही वाचकांना चक्रावून सोडणारी ती कविता आहे. ज्यांना विचारसामर्थ्याची कदर आहे, विचारक्रांतीची क्षमता आहे, उंच उंच होत गेलेल्या गगनचुंबी विचारशिल्पाची भव्यता पेलण्याची बौद्धिक कुवत आहे. त्यांच्यासाठी ही कविता आहे. विचारांचे भय, विचारांची असहिष्णुता, विचारांची दुर्बलता, विचारांची अप्रीती जपणाऱ्या वाचकांसाठी ही कविता नाही. 'नट्टापट्टा करून मनामनातून हिंडणाऱ्या पक्षपाती संस्कृतीला' जोपासणाऱ्या रसिकांसाठीही ही कविता नाही. 'बी' कवींनी गौरविलेल्या बंडखोर कवीची बंडखोर वाचकांसाठी अवतरलेली ही कविता आहे.

ही कविता सर्वंकष विद्रोहाची कविता आहे. इतका समग्र विद्रोह मराठी साहित्यातच नव्हे, तर भारतीय साहित्यातही अशा रूपात प्रकट झालेला आहे काय ? गौतम बुद्ध, चार्वाक, म. फुले यांची परंपरा ही मूलतः विवेकवादी विद्रोहाची आहे. उत्थानगुंफेचा विद्रोहवाद भावनाशील कविप्रकृतीचा आहे. म्हणून त्यांत भावनेच्या विमुक्त झेपेचा सर्वंकषपणा आहे. अग्नी आणि पाणी यांचा अंत लागत नाही, असे म्हणतात. भावनेचाही अंत लागत नसतो. म्हणूनच विद्रोहाच्या मर्यादा झपाट्याने ओलांडून जाणारा आवेग, उत्थानगुंफेच्या 'निषेधनाम्यात' आहे. बहुधा भारतीय परंपरेतही हा समग्र विद्रोह अगदी अपूर्व ठरावा ! तो पचविणे, पटवून घेणे म्हणूनच सामान्य मनाला झेपणारा नाही. या समग्र विद्रोहाच्या विराट व्याप्तीचे प्रभावी चित्र नजर फाडून टाकणारे आहे. कवी म्हणतो—

" जीवनाची नग्नता झेंड्यासारखी हाती घेऊन
 आजवरचे वंदनीय हिशेब नाकारावे लागतील
भारतीय परमात्म्याने डिक्लेअर केलेल्या गुलामी-
 सारखी
 जीवनाची सर्व षंढ तत्त्वज्ञाने पुसावी लागतील
सर्वच बेरजा कशा होऊ शकतात
 कटु भागाकारही करावे लागतील
अडाणी पायावर उभे सर्वच शतकांचे आंधळे मजले
 आजच्या आगीत पूर्जेपूर्वि जाळून पाहावे लागतील
उगीच दीर्घायू ठरलेले सन्मानीत आशय
 आजच्या उजेडात चाळावे लागतील
मेंदू लुवाडणाऱ्यांवर मनःपूर्वक थुंकताना
 संतापाच्या इतरही जागा मांडाव्या लागतील
जीवनासाठी जीवनाचे आजार नाकारावे लागतील
 साऱ्याच जिवंतांना मेलेल्यांचे शेजार नाकारावे
 लागतील "

—मेलेल्यांचे शेजार नाकारणारी, सर्वच शतकांचे आंधळे मजले त्यांच्या अडाणी पायांसकट जाळणारी ही मूलभूत निषेधाची विचारप्रणाली एक यूटोपिया आहे. यूटोपिया हा प्रेरक असतो. प्रक्षोभक असतो आणि मानवी संस्कृतीत कधीच जागा न लाभलेला जाणिवेचा स्फुल्लिंग असतो. हा यूटोपियन विद्रोह-

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

वाद दलित प्रतिभेलाच गम्य आहे, त्या प्रतिभेलाच तो आकळू शकतो, तो पाहण्याची व पेलण्याची क्षमता फक्त त्याच प्रतिभेला असते. दलितेतरांना त्या सर्वंकष निषेधाचा उच्चार आजवर करता आलेला नाही; कारण त्यांच्या विद्रोहाची व्याप्ती दलितांइतकी व्यापक संभवत नाही. दलितेतरांतील विद्रोह्य व अविद्रोह्य यांचे विषम प्रमाण हेच त्याचे कारण असावे.

सर्वंकष विद्रोहाची दृढ कृतबुद्धी—कन्व्हिक्शन—हे या कवीचे एक अनन्यसाधारण वैशिष्टय आहे. सगळीच दलित प्रतिभामने अशी निखालस विद्रोहवादी आहेत, असे नाही. हा कवीच म्हणून वेगळा आहे. आपल्याला काय हवे व कसे हवे याची एक निश्चित वैचारिक भूमिका या कवीच्या मनात रुजलेली आहे : तो म्हणतो :

" आहे जीव तोवर पाखडीत जाणारच आहे
शेवटचा दिस गोड होवो न होवो
आता बांधलेच आहे घर या निषिद्ध मैदानात
आतड्याचे गहिवर कुणी घेऊन येवो न येवो
... ... असे एकाकी पेटणे, पेटवणे मुक्रर केल्यावर
वणवा बुडवायला समुद्र मिळो न मिळो ... "

—विद्रोहवाद्याची नियती या कवीने जाणीवपूर्वक स्वीकारलेली आहे. तो 'आग' बनलेला आहे. विद्रोहाच्या वेडाने झपाटलेले हे आगळे कविव्यक्तिमत्त्व आहे. त्याची सगळी अंतःसामर्थ्ये, कल्पकता, वैचारिकता, शब्दपाटव त्या वेडाने रंगलेली आहेत. शिवरामपंत परांजप्यांची प्रतिभा जशी स्वातंत्र्याच्या वेडाने झपाटलेली होती, तशी मनोहरांची कविवृत्ती विद्रोहाच्या आगीने पेटलेली आहे. हे दृश्य खरोखरच अपूर्व वाटते.

उत्थानगुंफेतून विद्रोहाच्या विचारवनात जो धक्के बसविणारा प्रवास घडतो, मन शांत राखून अनुभवणे कठीण आहे. पण हा काव्याच्या कक्षेतील प्रवास आहे हे विसरून चालणार नाही. उत्थानगुंफा ही कदाचित् कविता नसेलही, पण ती काव्यात्म निश्चितच आहे. ती कुणाला पोएटिक वाटेल; पण पोएट्री वाटणार नाही. पण एक सर्वंकष विचारप्रणाली प्रतिभेच्या स्पर्शाने कसे देदीप्यमान रूप घेऊ शकते, विचारांना सौंदर्य कसे प्राप्त होते, बुद्धिगुणांना भावनागुणांची सुंदर लेणी कशी मिरविता येतात, भावनांच्या उत्कट उबदार कुशीत विचारांची बाळे गोंडस बाळसे कशी धारण करतात, यांचा ठसा उत्थानगुंफा पुरेपूर मनावर बिंबविते. या अंगाकडे दुर्लक्ष करून हे काव्य खऱ्या अर्थाने समजणार नाही.

आणि खरी समजण्यासारखी एक गोष्ट आहे : काव्यात्म विचाररूपात विहार करताना केवळ वस्तुनिष्ठ विचारमीमांसा त्यांचे रहस्य समजू शकत नाही. आणि कधीच्या आत्मनिष्ठेने त्या विचाररूपांना कळत नकळत दिलेले नाजूक छेद विसरून भागत नाही. काव्य आणि विचार यांच्यात नेहमीच एक द्वंद्वात्मक नाते असते. विचारांना त्यांच्या मुळच्या कक्षेबाहेर ओढण्याचा काव्याचा प्रयत्न असतो. त्यांच्या ऐतिहासिकतेची सीमा रुंदावण्याची खटपट काव्य करीत असते. किंबहुना विचारांचे भावनेतच रूपांतर करण्याची किमया काव्य करीत असते. म्हणून काव्यात्म विचाररूपे ही वस्तुनिष्ठ विचाररूपे हाती धरावयास जावे, तर ती अवचितपणे भावनारूपेच झाल्याचा चमत्कार घडत असतो. ही माया काव्याची असते. म्हणूनच काव्यात्म विचाररूपांना वस्तुनिष्ठ विचारमीमांसेच्या कसोटचा पूर्णपणे लावता येत नाहीत. एखादा विचार प्रतिभेच्या सुवर्णस्पर्शाने कशी तेजस्वी कळा व अफाट उंची अनपेक्षितपणे गाठू शकतो, हेच येथे पहावयाचे असते. म्हणूनच दलित वास्तवाच्या मूळ संदर्भातून उत्थानगुंफेतील विचार सुटतात व त्यांना एका व्यापक मानवी वास्तवाची कळा प्राप्त होते. दलितांच्या विद्रोहवादाची मर्यादित सीमा या उत्थानगुंफेपाशी उखडली जाते व ती एका आदर्शवादी म्हणजे यूटोपियन अशा समग्र विद्रोहवादात विस्तारली जाते. या दृष्टीने पाहता, विद्रोहाच्या वस्तुनिष्ठ मीमांसेला कवीच्या आत्मनिष्ठ रंगांची समज लाभली नाही, तर या संग्रहातील कितीतरी कविता समजणे कठीण आहे :

" दुनियेत चंद्रसूर्याच्या
मज कुणिच घेतले नाही
या जन्माची कधी माझ्या
कुणी आई झाले नाही "

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

– चंद्रसूर्यांच्या दुनियेत आपला कुणी स्वीकार केला नाही, आईच्या नात्यासाठी आसुसलेले हे कविमन उपेक्षितच राहिले. कविमनाच्या या व्यथा, ही आत्मनिष्ठ वळणे केवळ विद्रोहाच्या विचारसरणीचा मागोवा घेण्याने उमगणार नाहीत. खरे तर ती विद्रोहाच्या विचारसरणीशी अनुरूपही नाहीत. आईची कूस शोधणारे मन समग्र निषेधवादी असूच शकत नाही कारण आईबरोबर एक संपूर्ण परंपरा व संस्कृतीही स्वीकारावी लागते. पण महत्त्वाचे हे नाही. एक संपूर्ण संवेदनशील व्यक्तिमत्त्व एकाच विचारप्रणालीवर एकसारखे व एकसुराने अखंडपणे रेंगाळत नाही, हे महत्त्वाचे आहे आणि ते व्यक्तिमत्त्व कवीचे असेल, तर हे केवळ अशक्य आहे. म्हणून जरा सावध चित्तानेच उत्थानगुंफेत विहार करावा लागतो. या विहारात विचारमीमांसा महत्त्वाची नाही असे नाही; पण अखेर खरी मीमांसा एका कविमनाचीच करावी लागते. उत्थानगुंफेतील कविमन तर असे उत्कट, जिवंत व विचारदक्ष नि भावनादक्ष आहे, की त्याने रूपास आणलेली काव्यात्म चित्रे अंतःचक्षू चक्रावून सोडतात. विद्रोहवादाचा यूटोपिया पटो न पटो, इथे एका प्रतिभावंत मनाचा जिवंत अनुभव मिळतो. मराठी मीमांसक काव्य या उत्थानगुंफेने समृद्ध केले आहे आणि प्रज्ञा व प्रतिभा यांचे द्वंद्वात्मक नाते काव्यात्म उंची कोठवर गाठू शकते, याचे ज्ञानेश्वरानंतर पुन्हा एकदा प्रत्यंतर घडविले आहे. यापुढचा मराठी विद्रोहविचार व वैचारिक कविता या दोहोंना उत्थानगुंफेचा टप्पा टाळता येणार नाही. कारण विद्रोहविचारात भावनेचा प्रभाव कसा दूरगामी व आदर्शाकांक्षी ठरू शकतो आणि विचारकाव्यात विचारांची उंची व दीप्ती किती भव्यदिव्य असू शकते, याची कल्पना ‘ उत्थानगुंफे ’वरून येऊ शकेल आणि याची दखल विचारवंत व प्रतिभावंत या दोहोंनाही घ्यावी लागेल. मराठी सांस्कृतिक विचारवंतांना काव्यदृष्टीची महती पटवून देण्याचे व जीवनमूल्यांच्या कक्षेत काव्यमूल्याला पुन्हा एकदा प्रतिष्ठित करण्याचे कार्य ज्या थोर कवींनी आजवर केले, त्यांच्या पंक्तीत ‘ उत्थानगुंफे ’चा कवी सहजपणे बसू शकेल. आता ही उत्थानगुंफा खुली झालेली आहे; तिच्यात नव्या तपोनिधींनी आपापल्या कलात्मक तपस्यांची पद्मासने घातली पाहिजेत .........

– रा. ग. जाधव

---

**‘ सुरुंग ’**– ( काव्यसंग्रह )– त्र्यंबक सपकाळे. अस्मितादर्श प्रकाशन, ३७, लक्ष्मी-कॉलनी छावणी औरंगाबाद. पृ. १२ + ४८, किंमत ७ रु.

---

श्री. त्र्यंबक सपकाळे यांची कविता ‘ अस्मितादर्श ’ ‘ प्रतिष्ठान ’ ‘ साधना ’ इत्यादी नियतकालिकांतून पूर्वी प्रसिद्ध झालेली आहे. त्याचवेळी या कवितेने रसिकांचे लक्ष वेधून घेतले होते. ‘ सुरुंग ’च्या रूपाने या साऱ्या कविता एकत्रपणे वाचावयास मिळतात. आणि या कविमनाचे आगळे–वेगळे दर्शन घडते.

ही कविता वाचून संपल्यानंतर जाणवते की, ती विलक्षण संयत आहे. ‘ मनोगता’त कवीने आपल्या वेदनेचा सूर मराठी साहित्यात सापडला नाही; असे म्हटलेले आहे. त्यांच्या कवितेत मात्र हा वेदनेचा सूर गवसतो. शिवाय ही एकांगी, एकच राग आळवणारी सुरावट नाही. तर विविध सुरांचे संमीलनच येथे ऐकावयास मिळते. दलित मनातील अन्यायाविषयीची जाणीव, स्वाभाविकपणेच त्या विषयीची प्रतिक्रिया त्या कडवट, उग्र प्रतिक्रियांचे झालेले नवनिर्मितीत परिवर्तन ही या कवितेची काही वैशिष्टये म्हणता येतील. या संस्कृतिप्रिय देशाला आपल्याच मुलाला न्याय देता आला नाही. त्याच्या ‘ संस्कृतिप्रिय ’तेला केवढ्या मर्यादा आहेत हे स्पष्ट करताना ‘ नागवा मी ’ या प्रारंभीच्या कवितेतच कवी म्हणतो,

> हे संस्कृतिप्रिय देशा !
> माझा नागडेपणा तुला
> कधी झाकताच आला नाही ?

अनेक कवितातून या संस्कृतीचे अपुरेपण, तिच्या मर्यादा कवीने वेगळ्या रूपाने शब्दबद्ध केलेल्या आहेत. ‘ पृथ्वी गोल आहे ’, ‘ दिवाना ’, ‘ कोड ’ या कविता या अन्यायाचे सार्वत्रिक रूप आणि अन्याय करणाराची बेफिकीरीच व्यक्त करतात. खरे तर









अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

सुशिक्षित काय अथवा अशिक्षित काय सारेच जण या तथाकथित वैभवशाली संस्कृतीचे गुलाम आहेत. स्वातंत्र्याच्या उदयकाली वसंत बापटांसारख्या कवीने 'स्वातंत्र्य ? कुठे स्वातंत्र्य ? कुणा स्वातंत्र्य ?' हा प्रश्न विचारला होता. पाव शतक झाले, आजही हा प्रश्न अनुत्तरित आहे. आपल्या दैनंदिन जीवनातून हा कलंक काही पुसला गेलेला नाही. हे दुःख अत्यंत सौम्य रंगात, कधी उपरोध, उपहासाच्या वळणाने कवी संयतपणे रेखाटतो.

ही कविता या विषमतेच्या बाह्य रूपापेक्षा, तिच्या आंतरिक रूपाचे, या अन्याय्य प्रवृत्तीची उकल करण्यात मग्न आहे. चातुर्वर्ण्य, धर्मांधता, जातियता इत्यादींचे 'स्वागत' करून पशुपक्ष्यांचे स्वागत मात्र आपणाला करता येत नाही, अशी दिलगिरी कवी व्यक्त करतो. कारण त्यांचा पाणवठा अलग नाही. अर्थात हा उपहास ओरखाडे ओढणारा, झोंबणारा, विध्वंसक स्वरूपाचा नाही. समाजातील विकृती दूर होऊन ही संस्कृती, हा देश अधिक निकोप आणि निरोगी वातावरणात नांदावा हा ध्यास कवीला आहे. अर्थात या विधायक वृत्तीला संघर्षाचे वावडे आहे असेही नाही. संघर्ष अटळ असेल तर तो स्वीकारण्याचीही कवीची तयारी आहे. 'आता रडायचे तर' 'एकच हात' या कवितांतून हा संघर्ष व्यक्त होतो. याचे स्वरूप प्रतीकात्मक आहे. या अन्याय्य प्रवृत्तीच्या मार्गाने पुढिलांनी जाऊ नये, हा इशारा देणारा हा संघर्ष आहे.

विद्रोहाची ठिणगी नेत्रात पेटलेली असली तरी समाजाविषयीचा ओलावाही तेथेच आहे आणि हे या कवितेचे लक्षणीय वैशिष्टच मानावे लागेल. 'होशील का तू आई' 'तर मी काय करू ?' 'डोळे' या कविता या संघर्षाच्या पलीकडची क्षितिजे अधोरेखित करतात. 'डोळे' या कवितेत कवी म्हणतो,

'कलम' करायचे
या सर्व डोळ्यांचे
हवेत आता
भगवंताचे डोळे'

या कवितेला प्राक्कथांमुळे (myths) एक वेगळे परिमाण लाभलेले आहे. 'एकलव्य' 'कर्ण' 'भीष्म' या प्राचीन भारतीय साहित्यातील तर 'इडिपिस' हा प्राचीन युरोपीय साहित्यातील प्रतिमा मानवाच्या सहनशक्तीचा अतिरेक त्याच्यातील मानव्यच कसे हरवून टाकतो यांवर प्रकाश टाकतात.

'सुरूंग' मनामध्ये स्फोट घडवतो. श्री. भ. मा. परसावळे यांचे मुखपृष्ठ विलक्षण बोलके आहे. सुरूंगाच्या पाठीमागील पार्श्वभूमीचा निळा रंग कवीचे वडील, बाबासाहेबांची प्रेरणा आणि भगवान बुद्ध व त्याची प्रज्ञा आणि करुणा यांचा अनुबंध अधिकच स्पष्ट करतो.

* * *

---

**'पाऊलखुणा'** (काव्यसंग्रह)– श्री. बालाजी टेकाळे व श्री. राम कंधारकर. मनकर्णिका प्रकाशन, कंधार (नांदेड), पृ. – ६८ किंमत ५ रु.

---

मराठवाड्यातील नवोदित कवी बालाजी टेकाळे व राम कंधारकर या दोन नवोदित कवींचा 'पाऊलखुणा' हा काव्यसंग्रह शारीरिक आकर्षणातच गुरफटून जाणाऱ्या आणि त्यातच तृप्ती शोधणाऱ्या, समाजमनाशी एकरूपत्व साधण्यासाठी आतुर असलेल्या मनाच्या संवेदना शब्दांकित करतो. श्री. बालाजी टेकाळे यांच्या अनेक कवितांतून या शारीरिक आकर्षणाचीच वलये पहावयास मिळतात. 'इच्छा' या कवितेत कवी म्हणतो,

'नशा प्रेमाची वेगळी
धुंद मदनाची आगळी
दीप मालव आता
चंद्र ढळला पश्चिमी'

–तरीपण 'परिपूर्ती' 'मधुघट' 'शिकार' या त्यांच्या काही चांगल्या कविता आहेत. निसर्गप्रतिमांच्या साहाय्याने ही कविता चैतन्यमय बनण्याचा प्रयत्न करते. प्रयत्न करते असे म्हणावयाचे; कारण आशय आणि अभिव्यक्ती, भावानुभवाचे परिणत रूप यापासून ही कविता अद्याप दूरच आहे. प्रस्थापितातील जडभागावर हल्ला करताना 'पाऊलखुणा' 'लिलाव' या कवितात कवी आक्रमकही बनतो. 'खंदतोय खड्डा' 'पिंपळ डोह'





राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

या कवितातून अधिक गूढ आणि तरल छटा व्यक्त झालेल्या आहेत.

'... वाऱ्याच्या झुळका ... झंजावात सोसून
पिंपळ गात्रन्‌गात्र शहारलाय
पानांच्या शिराशिरातून ... फांद्यातून ...
रात्र झिरपतेय ... ...
पिंपळडोही भवरा वनून ... ... '

या ओळी आपले लक्ष वेधून घेतात.

श्री. राम कंधारकरांच्या कवितांचा स्थायीभावही शरीरमीलनाची ओढ आणि सामाजिक दुःखाची जाणीव हाच आहे. यंत्रयुगात श्रमिकांची शक्ती कवडीमोलाने विकली जाते आणि धनिकाच्या अत्याचारांचा असहाय्यपणे मानव स्वीकार करतो. याच वास्तवाची प्रतिबिंबे अनेक कवितातून दृग्गोचर झालेली आहेत. 'आम्ही हे असे' या कवितेतून आजच्या मानवाचे खुजेपण, क्षुद्रत्व कवी समर्थपणे व्यक्त करतो :

'आम्ही कर्ण आहोत . . .
मुक्त हस्ते दान देणारे . . . घेणारेही !
आणि म्हणूनच–
असं जीवन जगताहोत
वटवाघळासारखं ?

'रक्तकमळ' या कवितेतून 'कमळ' ही प्रतिमा श्रमिकांच्या श्रमाचे प्रतीक म्हणून येते. हाडे मोडणाऱ्या वेदना सोसावयाच्या त्या मृत्यू प्रसन्न व्हावा म्हणून. श्रमिकांची ही ससेहोलपट श्री. कंधारकर समर्थपणे व्यक्त करतात.

या दोनही कवींच्या कवितात पहिलेपणाच्या, नवखेपणाच्या खुणा जाणवतात. अनेक ठिकाणी अशुद्ध शब्दही संग्रहात आहेत. उदा. 'रूढीप्रीस्य' (पृ. १३), 'चरित्र्याचा' तरीपण या काव्यसंग्रहातील काही चांगल्या कविता वाचल्यानंतर कवींच्या पुढील कवितांविषयी वाचकांच्या अपेक्षा अधिक उंचावतात.

–पंडित टापरे

---

**'नितान्त'** : (काव्यसंग्रह)
–वा. रा. सोनार; चेतश्री प्रकाशन, अमळनेर; फेब्रु. ७६; पृ. ६५; किंमत रु. ७.

'कवितेत विरहाला प्राण देणारे पक्षी' शोधणाऱ्या आदिम प्रियकराच्या चिरनूतन वेदनेचा किनारा शोधणारी वा. रा. सोनारांची ही कविता म्हणजे अतिशय उत्कट अशी भावकविता (लिरिक्स) आहे. 'गझल' मध्ये आत्मा शोधणारी ही विशुद्ध प्रेमकविता आहे. याचा अर्थ तिचा आकार 'गझल' चा नाही; आशय आहे. इथे प्रश्न 'झेलण्याच्या सामर्थ्याचा नाही' तर तिच्या 'अंधुकही न शहारण्याचा आहे.'

'प्रेयसीच्या विरहासारखा हा मरणभ्रान्त काळोख
पावले गळाली मागेच संपून गेले वाळवंट शोक'

आता जवळ उरलेली आहेत ती पायाशी झळझुळणारी प्रणयभोर समुद्रगाणी. त्या समुद्रगाण्यांचे उत्कट विलाप. पुरात उरलेल्या खडकासाठी लाटाहाती चाललेली गाणी.

– भोवताल सारं फिक्ष होत चाललंय्, दिशाही फिक्ष होताहेत. शत्रूसारखा हा थंडगार पाश मस्तकात भिनतो आहे. कशाचीच संगती लागेनाशी झालीय. तुमची वस्ती लागली पण माझा मलाच ठाव नाहीय्. माझ्या पालाणाला ही घरे, या वस्त्या सारीच अपुरी पडताहेत. याच वस्तीत उद्याच्या बातमीतली प्रार्थना शोधतो आहे . . . .पण गावकऱ्यांना कसलीच वार्ता ठाऊक नाही. इथे तर निराधारांचे श्वास पावलात भरल्यामुळे आयुष्य इतकं कोवळं कोवळं बनून गेलंय. शब्दच गळून पडलेलं हे दुःख तिच्यापर्यंत पोचवायचे कसे ? त्यासाठी तिने यायला हवे, 'या घरावर निष्ठुर फणा आदळणारी वाट सोडून.' – – म्हणून प्रतिसादाच्याही पलीकडे पोचणारे हे एकाकी साद. तू ये . . . . तू यावेस . . . तू आलीस की 'या समोरच्या वणव्याला सामोरे जाऊ या ! आपल्याच पायांखालच्या वाटांना कापूर घालू या.'

. . . . . . एक चिरविरह. एक आदिम साद. आणि अखंड प्रतीक्षा.

खरे तर या प्रतीक्षेलाही तसा अर्थ राहिलेला नाही. सुरवातीतच शेवटाची नांदी लावणारी अशीच ती भेट होती ... ...

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

'आता कुठे मुळातून प्रवास सुरू झाल्याचे
आपण एकमेकांना सांगितले
आणि काळजीपूर्वक निरोपाची जखम नोंदवली.'

तरीसुद्धा तिच्या जाण्याला तसा अर्थच उरलेला नाही. मरणांचे वर्षाव करणाऱ्या त्या क्षणाने सगळे आयुष्य केव्हांच आंदण घेतले आहे. आता प्रत्येक क्षणावर तिचेच गोंदण आहे. आणि तेच सहन होईनासे झाले आहे. 'कोठेही जावे तर आधीही ती असतेच ... नंतरही.' तिचे हे वेळी-अवेळी मनात येणेच खरे तर आता सहन होईनासे झाले आहे. छातीत दाटणारा हा पूर सहन कसा करायचा ? ही वेडी आशा आणि ही वेडी प्रतीक्षा...

'हा वेडा कंदिल उशाशी आता केवळ तिच्याचसाठी
ती येई तो वाचील बिचारा विझल्या भेटीसाठी'

भरतीच्या लाटेने ती आयुष्यावर सांडून आली, हा एवढाच आधार आयुष्याला खरे तर पुरेसा नाही का ?

हा विलक्षण आर्त, तरल भाव श्री. सोनार अतिशय समर्थपणे पकडतात. त्यासाठी तशाच सार्थ उपमा-प्रतिमांचा ते चपखल उपयोग करतात; उदा., 'तिचे डोळे ... पाण्याची मासोळी चुकवावी कळशीत असे तुडुंब एकाकीपणाचे,' 'एखाद्याच ज्योतीने फाडलेला अंधार ओल्या जखमेसारखा,' 'चांदण्यात ती ओल्या दुःखासारखी चंद्रच वाहून नेते.'

'ही कुण्या नभाची खिडकी... जन्माची वैरीण झाली
ढग काळे आवर बाई ... ती कधीच बरसून झाली'

या व अशा कितीतरी ओळी सोनारांच्या रचनेची सहजसुंदरता, माधुर्य आणि कोमलपणा यांचे देखणे दर्शन घडवितात. त्या दृष्टीने 'तो मला पुन्हा पुन्हा भेटत राहिला-' ९, ' 'त्याच्या गाण्यातील रक्तधून-' १३, 'आत्ताच डोंगर धुक्यातून वर वर येतो आहे-' २२, 'प्रेयसीच्या विरहासारखा हा मरणभ्रान्त काळोख-' २४, 'दिवसभर हिरवे रान वाऱ्याबरोबर डहळून गेले-' ३६, 'रात्र काळी पावसाळी-' ४१ या कवितांचा येथे आवर्जून उल्लेख करायला हवा. दोन किंवा चार ओळींच्या सर्वत्र विखुरलेल्या छोटद्या-छोटद्या रचनातूनही त्यांच्या विलक्षण भाषाप्रभुत्वाचे प्रत्यंतर येते, उदा., 'सकाळपासून काळे ढग / मनाशी समांतर / दूर टाचलेला सागर / लाटा लाटा गहिवर.'

दैनंदिन रुक्ष जीवनक्रमात ही कविता काही उत्कट भावप्रत्यय देते; खोलवरचे थर मनातून उलगडून काढते आणि एक हळुवार, तरल अनुभव ओठावर सहज रेंगाळणाऱ्या शब्दातून देत जाते. वा. रा. सोनारांचे हे यश साधे नव्हे. मुखपृष्ठावरील अतिशय सुंदर चित्रानेही हा 'मूड' सर्वार्थाने पकडला आहे. श्री. सुभाष अवचटांचा या सुंदर मुखपृष्ठासाठी आवर्जून येथे नामोल्लेख करायला हवा.

* * *

---

**'मूड्स'** : (कवितासंग्रह).
नागनाथ कोत्तापल्ले; साहित्य साधना,
औरंगाबाद; पृ. ४८ किंमत ६ रु.

---

प्रा. नागनाथ कोत्तापल्ले यांचा हा पहिला काव्यसंग्रह गुरुवर्य लक्ष्मीकांत तांबोळी यांना अर्पण केलेला आहे, प्रा. कोत्तापल्ले गेली काही वर्षे दर्जेदार काव्यलेखन करत आहेत. सध्या ते 'प्रतिष्ठान'चे कार्यकारी संपादक आहेत. या परंपरेचा येथे आवर्जून उल्लेख करावा वाटला; कारण तीमधून कोत्तापल्ले यांच्या वाङ्मयीन व्यक्तित्वाची जडण-घडण आणि निष्ठा सूचित होतात. मराठवाड्यातील नवोदित कवींमध्ये प्रा. कोत्तापल्ले यांचा अग्रक्रमाने उल्लेख करावा लागेल.

'मूड्स' वाचण्यासाठी उघडताना ही परंपरा मनामध्ये नकळत उभी होती आणि त्या परंपरेने निर्माण केलेले प्रश्न, प्रवृत्ती, आश्वासने, आणि आकांक्षा यांचे दर्शनही 'मूड्स' मध्ये ठळकपणे झाले. 'कविता : प्रेषिताच्या, 'कविता : स्वप्नांच्या,' 'इथली माणसे : चार दर्शने' ही त्याची काही उदाहरणे. अपरंपार निराशा व हरवलेली परंपरा (ओसाड माळरान- काफिले- ओघळलेली पिसं- तडफडणारे दूरवर वठलेले वृक्ष- उधळलेले धुळीचे लोटचे लोट); दुष्ट इतिहास ('हातांनी लोटूनही संपत नाहीत हे दिवस / फिरत राहतात त्यांचे


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

करवंती काठ मानेवरून ') आणि 'बाजूलाच जळणारे आयुष्याचे थोटूक घेऊन' धुनीवर हात शेकणारे शापित आयुष्य घेऊन जन्मणारी ही कविता 'अधून-मधून रक्तस्राव तशी एखादीच ओळ ... / प्रश्नांची ठिबक ठिबक... रक्तासारखीच' या स्वरूपाची आहे. हे गाणे गाण्यासाठी त्याचे व्यासपीठ मृत इतिहासाचे–भकास स्मशानाचे आहे; कवी कबरीवर उभे राहून आपल्या 'घोषिताची कविता' गातो आहे. दशदिशांतून त्याच्यावर सडक्या अंड्यांचा, कुजक्या शब्दांचा, दगडांचा प्रचंड वर्षाव झाला आहे. अंगावर आलेल्या लमाणांच्या तांड्याला त्याने आपली जीभ आपल्या हाताने काढून दिली आहे. ( जसा एकलव्याने आपला आंगठा गुरूला दिला ).

इतक्या उद्‌ध्वस्त करणाऱ्या वास्तवातही ही कविता स्वप्नाची, प्रेषिताची गाणी गाते आहे. या भुंड्या झाडांनाच हळूहळू धुमारे फुटणार आहेत; या शांततेचा स्फोट होणार आहे. 'वडावर टांगलेल्या मेघांचा घुत्कार बांध फुटून अनावर' आहे, तरीही 'उगवून येणारे कोंभ काठाकाठाने' आहेतच. 'अंड्यासहित फडफडती मादी तसे काठाने प्रतिमांसहित' वाहणारी कविता. त्यातून निर्माण होणारा नवजन्म 'रखरखीत नवजात दुपारचा' आहे. काळोख पिऊन मऊशार झालेल्या मातीत स्वतःच्या विनाशाचे कवी बीज पेरतोय; ते एकाच आशेवर, की उद्या तरी फांद्याफांद्यांनी झाड आकाशभर बहरेल, कुठली तरी दिशा आपली होईल आणि केव्हातरी आपलाच किनारा आपल्याला लाभेल. या आशेच्या जोडीला 'खुशाल मृत्युफुले माळण्याचा' कृतनिश्चयही आहेच. 'आम्ही सारेच मरण्यासाठी' अशा निश्चयाने 'उगवणाऱ्या सूर्याला अडविण्यासाठी पाजळलेल्या तलवारी' घेऊन इथली माणसे सिद्ध आहेत. आपल्याच प्रेतावर लोटण्यासाठी त्याच स्वप्नांची माती जपण्याचा उपहास आहे.

या कटिबद्ध कवितेतील रिंदाही 'अफवांच्या प्रचंड वादळात' एखाद्या दीपस्तंभासारखी शांत उभी आहे. रिंदाचा आठव व शोध जळणारा जिवंत येशू क्रूसवर टांगलेला असतानाच चालू आहे. आयुष्यात भेटणारे हे अलवार, कोवळे क्षणही प्रखर वास्तवातच सामोरे झाले आहेत – 'समोरचे झाड, रस्ते, महाविद्यालय आणि इकडेतिकडे फिरणारी ही असंख्य माणसं' अशा वेळी आणि अशा वातावरणात भेटणारी ही रिंदा आहे; या असंख्य प्रश्नचिन्हांपलीकडचं एक प्रश्नचिन्ह आहे; जगण्याचे सगळेच अर्थ आता बदलून गेले आहेत; तरीही ओंजळीच्या शिंपल्यात जपलेला आणि रात्रीच्या टोकदार डहाळीवर उमललेला हा चंद्र हेलावत्या समुद्रात हळूवार सोडून दिला आहे. हा चंद्र गंधगर्भ लाटांबरोबर हेलकावत चालला आहे आणि त्याबरोबरच रेषा रेषा उलगडत चालली आहे.

– कविता बदलणाऱ्या संदर्भाचे 'मूड्स' जपणारी अशी ही आहे. कृतनिश्चयी, कटिबद्ध आहे तरी आक्रस्ताळी, अगतिक नाही. 'कोण्या एका कवीचा' ती कडवट उपरोध करते; तरीही विध्वंसक नाही. प्रखर वास्तवाला सामोरी जाणारी आहे तरी, हळुवार आठवणी त्या संदर्भात मोडून टाकणारी नाही. जीवनाच्या व्यस्ततेचे भान जपताना नकारांच्या घोषणेतच रमणारी नाही. 'अंधार सरपास करताना' 'उद्‌ध्वस्ताच्या किनाऱ्यावर शाबूत असलेली स्वप्नभूमि' ही कविता जपू पाहते आहे.

**— प्रतिभा पोरे**

---

**सर्वोत्कृष्ट मराठी कथा : खंड १० वा**

संपादक– राम कोलारकर व सौ. छाया कोलारकर

प्रकाशक– सौ. छाया कोलारकर, ४३/३४८, संत तुकाराम नगर, पिंपरी, पुणे–४११०१८, पृ. २०८, किंमत : २२ रु. ५० पैसे.

---

सुप्रसिद्ध कथासमीक्षक श्री. राम कोलारकर हे प्रतिवर्षी मराठीतील उत्कृष्ट कथा निवडून त्या संग्रहरूपाने प्रकाशित करतात. या कथा वार्षिकाचा दहावा खंड नुकताच (जाने. १९७८) प्रसिद्ध झाला असून, त्यात १९७३ मधील एकूण ४००० कथांमधून श्री. कोलारकरांनी निवडलेल्या २३ कथा आहेत. यावरून श्री. कोलारकरांच्या कथेवरील उदंड प्रेमाची व निष्ठापूर्वक परिश्रमांची कल्पना येते.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

या संग्रहात कथांचे प्रकार पाहावयास मिळतात. आधुनिक जीवनातील वेगवेगळ्या जाणिवा व अनुभूती, नवनवे घाट, शैली, प्रतिमा, प्रतीके यांच्या द्वारा साकार करणाऱ्या काही लक्षणीय कथा आहेत. कमल देसाईंच्या ' पाळत ' या कथेतील नारायण ब्रह्मेच्या मनोविश्वात स्वप्न आणि वास्तव यांची चमत्कारिक सरमिसळ होते आणि आभासात्मक ' कोणीतरी ' त्याचे संपूर्ण अस्तित्व गिळून टाकते. त्याच्यावर एकसारखी पाळत ठेवते आणि नारायणला जगण्याचे ' स्वातंत्र्य ' रहात नाही. या ' कोणीतरी 'ला अनेक प्रतीकात्मक अर्थ प्राप्त होतात. उदा., बाह्य जगाची जाणीव, किंवा मानवी जीवनाला नियंत्रित करणारी अदृश्य, अनामिक शक्ती. कार्यकारणभावापलीकडील अतींद्रिय, गूढ व अमूर्त संवेदना ' कोणीतरी ' च्या रूपाने प्रकट होतात आणि काळ व अवकाश यांच्या जाणिवा निसरड्या होतात. मग सारे आयुष्यच गोंधळाचे, अस्ताव्यस्त होऊन जाते. एक चमत्कारिक भयगंड निर्माण होतो. मानवी जीवनातील असुरक्षितता व मूलभूत विसंगती यांचीच जाणीव होत राहते. हा सारा आशय प्रतीकात्मक पातळीवर व कलात्मक सामर्थ्याने या कथेने पेलून धरला आहे. ज्ञानेश्वर नाडकर्णीच्या कथेत ( गेंद ) गुलाबाच्या गेंदाला अनेकार्थी प्रतिमेचे रूप लाभते. रुक्ष व ओसाड आयुष्याच्या चाकोरीला नवा अर्थ; सर्जनशीलतेचे आगळे प्रकटीकरण, रोमँटिक, लैंगिक सुप्त चाळ्याचा आविष्कार व या सर्व भावभावनामागील सातत्य हे या प्रतिमेतून रूपास येते. विजया राजाध्यक्षांच्या ' अनोळखी ' या कथेत एका स्त्रीच्या मनोव्यापारातून माणसा-माणसातल्या परस्पर-संबंधांचा सखोल शोध घेतला आहे. अनेक वर्षे एकत्र राहूनही खरी इंटिमसी निर्माण होत नाही, केवळ औपचारिक पातळीवरचे स्नेहसंबंध व्यक्तिमनात खोलवर रुजत नाहीत, खरी इंटिमसी ही फक्त स्त्रीपुरुषातच आणि तीही केवळ शारीर संभोगाच्या पातळीवर होऊ शकते, एऱ्हवी सारे अनोळखीच असते, ही काही सूत्रे. श्री. अनिल रघुनाथ कुलकर्णी ( शून्य एके शून्य ) यांच्या कथेत याच मानवी नातेसंबंधांची एक टोकाची अवस्था— संवादाचा अभाव— वर्णिली आहे. एक तर मुळातच सुसंवादित्व नसते, शिवाय भावजीवनाचा खोटेपणा असतो; म्हणून माणसे एकाकी जिणे पतकरतात. ' सांगाड्या'सारखे स्नेहभावशून्य आयुष्य जगतात. या संग्रहात स्त्री-लेखिकांचे प्रमाण जास्त असल्याने स्त्रियांचे वेगवेगळ्या वयोवस्थांतील व मनोवस्थांतील खास अनुभव व्यक्त झाले आहेत. ' मेनॉपॉज' नंतर स्त्रीच्या मानसविश्वात माजलेली खळबळ व त्यातून मातृत्व व स्त्रीत्व हरपल्याची विद्ध जाणीव ( एक दिवस : अनुराधा पोतदार ); आई-वेगळ्या मुलीचा भावनिक थंडपणा व हळुहळू निर्माण होत गेलेली दुःखभावाची ऊब ( पाऊस आला मोठा : गौरी देशपांडे ); एका सुस्वरूप पण वेडगळ मुलीच्या मनाचे खेळ, कल्पनांची जिवंत रूपके रचणारी तन्मय मनोवस्था, त्यात अचेतनाला लाभलेली सचेतनांची रूपे व अखेर तिच्या दुर्दैवी मृत्यूत झालेले त्याचे पर्यवसान ( पानगळ : वसुधा माने ); आंधळ्या प्रियकराविषयी आपल्याला वाटत असलेला मानसिक दुरावा त्याला स्पर्शातून कळतो आहे, या भावनेने असह्य झालेली स्त्री ( स्पर्श : सानिया ) आणि एका कसोटीच्या क्षणी एऱ्हवीच्या दिलदार, धीरोदात्त प्रियकरातला अंतस्थ भेदरटपणा व खोटेपणा जाणवल्याने प्रेयसीने त्याचा कायमचा घेतलेला निरोप ( गूड बाय फॉर एव्हर : नीलम करंदीकर ) ही या स्त्रीविश्वाची विविध रूपे. ग्रामीण जीवनातील वेगवेगळ्या स्तरांवरचे अनुभव व्यंकटेश माडगुळकर ( पिंजरा ), चारुता सागर ( दावं ) व आनंद यादव ( काळा धागा ) यांच्यां कथांतून व्यक्त झाले आहेत. खेड्यातील सामाजिक जीवनाची चौकट फार जाचक व दृढ असते. गावातल्या प्रत्येक व्यक्तीचे जीवन गाव-गाड्याला जखडलेले असते. या चौकटीबाहेर एक स्वतंत्र आयुष्य व्यक्ती म्हणून जगावे. असे जरी एखाद्याला वाटले तरी ते फार अवघड होऊन बसते. स्वतःभोवती ' पिंजरा ' उभारूनही गाव-गाड्यापासून सुटका होत नाही, हे माडगुळकरांच्या गोपा सुताराला अनुभवास येते. दुष्काळ हा शेतकऱ्यांच्या जीवनाला नियतीने दिलेला अटळ शाप आहे आणि स्वतःच्या प्राणापेक्षाही प्रिय अशी जनावरे दुष्काळाला बळी पडतात, हा दुःखभोग शेतकऱ्याच्या लेखी मरणापेक्षाही भीषण, भयंकर असा


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आहे. या करुणगंभीर अनुभवचित्राला चारुता सागर जिवंत करतात. आनंद यादवांच्या कथेत एका मोठ्या लिंगायत कुटुंबाच्या पार्श्वभूमीवर वृद्ध स्त्रीच्या तारुण्यातील पापवासनेचा 'काळा धागा' आपल्या नातसुनेपर्यंत आनुवंशिकतेने आला असावा काय, या तिच्या आशंकेचे चित्रण केले आहे. अतींद्रिय गूढ अशा शक्तींचे व मनोव्यापारांचे चित्रण या संग्रहातील 'द्रष्टा' ( रत्नाकर मतकरी ), 'इतकं सर्व पाहूनही' ( नारायण धारप ) व 'चेटुक' ( मंदाकिनी गोगटे ) या कथांतून आढळते. मानवी जीवनातील जन्म आणि मृत्यू या घटना अतर्क्य व बुद्धिवादापलीकडच्या, साहजिकच त्यांच्याभोवती अतींद्रिय अनुभूतींचे कल्पनाजाल विणण्याची प्रवृत्ती स्वाभाविकच म्हटली पाहिजे. मतकरींच्या कथेतील अर्धवट पंडितला भविष्यातील मृत्यू दिसतात. एऱ्हवी विकृत वेडसर असलेल्या पंडितला भविष्यकालीन मृत्यू वर्तवताना एक अतींद्रिय शहाणपण— 'द्रष्टे'पण लाभते. एवढेच नव्हे, तर त्याच्या भविष्यानुसार मृत्यू घडतातही. मृत्यू घडवण्याचे दैवी सामर्थ्य असलेल्या पंडितला त्यापायी स्वतःचे प्राण गमवावे लागतात. धारपांच्या कथेत एका प्रसूतिगृहात मृत बाळंतिणीचा आत्मा वावरतो आणि जन्माला येऊ घातलेल्या गर्भस्थ जीवाला भविष्यकालीन आयुष्यातील दुःखभोग, निराशा, व्यथावेदना, अपयश, मानभंग व एकूणच जीवनाची निरर्थकता दाखवून देऊन जन्माला येण्यापासून परावृत्त करतो. पण आयुष्य त्यातील दुःखभोगांसह, अपयश—नैराश्यासह भोगण्याची अनावर लालसा व जन्मजात कुतूहल माणसाच्या ठायी असते, त्यामुळे त्या मृतात्म्याच्या पाशातून स्वतःची सुटका करून तो गर्भातला कोवळा जीव या जगात पदार्पण करतो. केवळ उत्कृष्ट रंजनात्मक पातळीवर लिहिलेल्या व म्हणून खास वाचनीय ठरलेल्या कथांमध्ये आनंद अंतरकर ( जगलेल्या कथेची गोष्ट ), पद्मजा फाटक ( मैत्री ) व श्री. दा. पानवलकर ( लाल गुलाब आणि पाणीवाला ) हे उल्लेखनीय.

: तर हा १९७३ मधील सर्वोत्कृष्ट ( व काहीशा प्रातिनिधिकही ) कथांचा सारांशरूप आढावा. एक 'सँपल सर्व्हे' म्हणून त्याच्याकडे पाहिल्यास थोडयाफार फरकाने हेच चित्र— हेच कथांचे व कथाकारांचे स्तर व विविधांगी गुणवत्ता— १९७० मध्ये काय वा १९७५ मध्ये काय, आढळणार. जी. एं.चा एखादा 'मास्टरपीस' हाती लागेलही, पण तो अपवाद म्हणूनच. सर्वसाधारण मराठी कथेचा स्तर हा असा आहे. प्रस्तुत संग्रहातील बव्हंशी कथाकारांची कथा या तंत्रावर विलक्षण हुकमत आहे. मराठी कथा तंत्रदृष्टया खूपच प्रगत आहे, असेही म्हणता येईल. हे कथाकार सामान्यपणे जो अनुभव व्यक्त करू पाहत आहेत, त्याची प्रामाणिक ( व अनेकदा उत्कटही ) अभिव्यक्ती ते घडवतात. त्या दृष्टीने मराठी कथा आता स्थिरावली आहे. तिने सुस्थित व सुनिश्चित (वेल डिफाइन्ड) रूप धारण केले आहे. पण याच वळणावर मी स्वयंतुष्ट होण्याचा, आळसावण्याचा धोकाही संभवतो. मुळातच मराठी कथेचा आशयाचा परिघ हा मर्यादित आहे. आणि तिने बव्हंशी पारंपरिक अंगीकारला आहे. [अलीकडे जी. एं. नी मराठी कथेच्या आशयाला खूपच समृद्ध वेगवेगळी परिमाणे दिली आहेत व त्याचा परिघ खूपच विस्तारला आहे. त्यांच्या प्रतिभेच्या आधिपत्याखाली मराठी कथेच्या आशयाने 'देशांतर'ही केले आहे, हे सगळे जमेस धरूनही. कारण त्यांनी बव्हंशी कथेचा पारंपरिक घाटच स्वीकारला व त्या घाटाला अधिक आशयवाही बनवले. अर्थातच याचेही उचित श्रेय त्यांना दिलेच पाहिजे.] आजच्या मराठी कथेचे हे सुस्थित रूप मनाला अस्वस्थ करणारे, असमाधान देणारे आहे. खरे तर, आशयाच्या मर्यादित, बंदिस्त परिघाची कोंडी फोडून विमुक्तपणे बाहेर ओसंडणाऱ्या व घाटात सातत्याने नवनवीन धीट प्रयोग करणाऱ्या कथेची आता अपेक्षा आहे. कलेच्या क्षेत्रात कधीकधी मर्यादित लौकिक यशापेक्षा अलौकिक अपयश मोठे ठरते. आणि मरठी कथेला आता अशाच मोठ्या अपयशाची गरज आहे, की जे अपयश १९४५ नंतरच्या मराठी कथेला गंगाधर गाडगीळांनी दिले होते.

—एस. डी. इनामदार

---





राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

**' महदंबेचे धवळे ' :** संपादिका : डॉ. सुहासिनी इर्लेकर, प्रकाशक : आध्यात्मिक साहित्य प्रकाशन, तिलक रोड हैदराबाद. पृ. १२८ + ३८ किंमत १२ रु.

मराठीतील आद्य कवयित्री महदाइसा हिची ' रुक्मिणी स्वयंवरा ' वरील रचना ही त्या कथानकावरील मराठी रचनांची गंगोत्री मानली जाते. भक्तिप्रेमाने ओथंबलेल्या अंतःकरणातून, मुक्त ओवी सदृश छंदातून, स्त्रीसुलभ भावाविष्कार या काव्यात झालेला आहे. ' रुक्मिणी स्वयंवर ' ही मुळातच एक शृंगारपूर्ण प्रेमकथा, लोकमानसाला तिचे स्वाभाविक आकर्षण आहे. या कथाकाव्याचा उपयोग भक्त आणि परमेश्वर किंवा जीव आणि शिव यांच्या उत्कट संबंधाबाबत आपल्याला पंथाचे तत्त्वज्ञान प्रतिपादन करण्याकरिता महानुभाव आणि एकनाथांसारख्या वारकरी संतांनी केला आहे, मूळ महाभारत, रामायण किंवा भागवतासारख्या लोकप्रिय ग्रंथातील कथांत कालमानानुसार भर पडत गेली. आपापल्या कल्पनासृष्टीतून मूळकथांचे विश्लेषण करणाऱ्या पुराणकथा, दंतकथा, आख्यायिका निर्माण होत गेल्या. प्राकृत भाषांतून उपरोक्त कृतींवर झालेल्या रचनात अशा नवनिर्मित कथांचे दर्शन घडते. त्यामुळे प्राकृत ग्रंथातील कथोपकथांचा अभ्यास करताना त्या मुळाशी जशा ताडून पाहाव्या लागतात, त्याचप्रमाणे त्यांतील कविकल्पित अंश आणि लोकमानसातून निर्माण झालेला अंश किती हेही पाहावे लागते. महदाइसेच्या काव्यात लोकश्रुतीचा अंश बऱ्याच प्रमाणात आहे. महदाइसेला उत्स्फूर्त काव्यशक्तीचे देणे लाभलेले होते. त्यामुळे श्रीकृष्ण कथांचे श्रवण आणि त्याचेविषयीची उत्कट भक्ती यांच्या संयोगामुळे, गोविंदप्रभूंच्या विवाहस्वीकाराच्या एका तात्कालिक प्रसंगाच्या निमित्ताने, एका बहारदार काव्याची निर्मिती तिने केली. महदाइसेचे हे काव्य ' महदंबेचे धवळे ' या नावाने डॉ. सौ. सुहासिनी इर्लेकर ह्यांनी नुकतेच संपादित करून प्रसिद्ध केले आहे.

महदाइसा ही एक बहुश्रुत, जिज्ञासू, तत्त्वचर्चेची आवड असणारी मेधावी स्त्री होती. तिच्या जिज्ञासू प्रवृत्तीमुळेच चक्रधरांचे अंतरंग आणि महानुभाव पंथीय आचार-विचारांवर चक्रधरमुखातून अधिकृत प्रकाश पडू शकला. त्यामुळे महानुभाव पंथात नंतरच्या काळात जे ग्रंथ लिहिले गेले, त्यांत महदाइसेचा प्रश्न व चक्रधरांचे उत्तर अशी पद्धती अवलंबिली गेली आहे. सूत-शौनक, वैशंपायन, जनमेजय, शंकर-पार्वती यांसारख्या जोडचा प्रश्नोत्तर रूपाने कथानिवेदन करताना यापूर्वी वक्ता-श्रोता स्वरूपात आढळतात. तीच स्थिती चक्रधर-महदाइसेची आहे. चक्रधरांनी विविध प्रसंग किंवा व्यक्ती यांच्या निमित्ताने आपला विचार विशद करण्यासाठी अनेक कथा, दृष्टांत सांगितले. त्यात नेमकेपणा, रेखीवपणा, मार्मिकपणा यांचा आढळ होतो. ' लीळा चरित्रा 'त महेंद्रभटांनी अशा अनेक स्मृतींचे संकलन व संपादन केलेले आहे. महानुभावीय पंचकृष्णांपैकी चकपाणीचरित्र व गोविंदप्रभुचरित्र ही दोन चरित्रे सोडली तर दत्त, श्रीकृष्ण आणि स्वतः चक्रधर ( एकांक ) यांची चरित्रे चक्रधरांच्या मुखातूनच प्रकट झालेली आहेत. ती संपूर्ण चरित्रे नसून काही कथा आहेत. तीच पिढी पाठ असून त्याला पंथीयांची मान्यता आहे. या मूळ कथांत श्रीकृष्णविषयक अन्य कथांची भर घालून, मूळ संक्षिप्त कथा कल्पनाविलासाने सजवून, वाईदेशकर पाठाचे ' श्रीकृष्णचरित्र ' पुढे सिद्ध झाले. तेच आज अभ्यासकांपुढे असलेले दिसते. सौ. इर्लेकर यांनी महदाइसेच्या ' धवळयां'चे आगळेपण सांगताना या तथाकथित ' चक्रधरनिरूपित ' ( ? ) ' श्रीकृष्णचरित्रा'चा आधार घेतलेला आहे. या दोन कृतीची तुलना करताना चक्रधरांचे ' श्रीकृष्णचरित्र' वाङ्मयीनदृष्टचा रूक्ष, नीरस, कलादृष्टीचा अभाव असणारे ठरवून महदाइसेची सरसता त्यांनी दाखविली आहे; परंतु यात दोन प्रकारचा अन्याय होतो. हे त्यांच्या ध्यानी आलेले नाही. एक असे, की स्वतः चक्रधरांनी या संपूर्ण विस्तारित ग्रंथाची निर्मिती केलेली नाही. दुसरे असे, की चक्रधरविषयक महदाइसेच्या आत्यंतिक भक्तिभावाचा विचार न करता चक्रधरांना दूषणे देण्यात आलेली आहेत. स्वतः महदाइसेस किंवा पंथीयांनाही ही गोष्ट रुचण्यासारखी आहे, असे वाटत नाही. मुळात 'श्रीकृष्णचरित्रा'ची परिवर्धित आवृत्ती तेराव्या शतकाच्या



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अखेरीस किंवा चौदाव्या शतकाच्या प्रारंभी तयार झालेली आहे आणि महदाइसा तर संपादिकेच्याच मताप्रमाणे शके १२३४ च्या पूर्वी निधन पावलेली आहे. त्यामुळे महदाइसेसमोर हे 'श्रीकृष्णचरित्र' असण्याची शक्यताच नव्हती. प्रस्तावनेत सौ. इर्लेकर यांनी या चरित्रग्रंथाच्या निर्मितीच्या विचार केलेला नाही. त्यात येणाऱ्या कथा, उपकथा, शाप-उःशाप कथा ह्या मइदाइसेने चक्रधरांना स्मरण दिल्याने सांगितल्या गेल्या व त्या त्या कथांना पूर्णता आली, असे त्या मानतात. (पृ. २४) पण ही नंतरच्या परिवर्धकाची रचना असण्याची शक्यता त्या गृहीत धरीत नाहीत. एवढेच नव्हे, तर 'श्रीकृष्णचरित्र' ही संपूर्ण व सलग अशी चक्रधरांचीच रचना मानून त्या पुढीलप्रमाणे विधाने करतात, तेव्हा मोठे आश्चर्य वाटते! त्या म्हणतात, "तिने (महदाइसेने) चक्रधरांना असे प्रश्न विचारले, की ज्यामुळे श्रीकृष्ण-चरित्र तिला हव्या त्या स्वरूपात अवतरावे. श्रीचक्रधरांनी ज्याक्षणी श्रीकृष्णचरित्राचे निरूपण करण्यास आरंभ केला, त्याचक्षणी भागवतातील दशम स्कन्धाच्या बाराव्या शतकातील नव्या रूपान्तराला प्रारंभ झाला." (पृ. ३०) किंवा "भागवतातील रुक्मिणीहरणाची कथा फुलवून सांगण्याची श्रीचक्रधरांची (?) प्रवृत्ती त्यांनी या कथेत ज्या उपकथांची वा नवीन प्रसंगांची भर घातली, त्यांवरून लक्षात येण्यासारखी आहे." किंवा 'श्रीचक्रधर येथे एक नवीनच (रुक्मिणीच्या विरहाचा) प्रसंग कल्पून रुक्मिणीच्या विरहावस्थेस काहीसे भडक रूप देऊ पाहतात." (पृ. ३६) "जेथे श्री चक्रधरांची वाणी उणावते, तेथेच महदंबेची प्रतिभा नवी झेप घेताना दिसते." (पृ. ४०) 'श्री चक्रधर नेहमीच्या सरधोपट पद्धतीने हा कथाभाग सांगून पुढे जातात. उलट महदंबा या स्थळी थांबते, तेथे रेंगाळते ...' (पृ. ४१.) 'श्रीचक्रधरांची रुक्मिणी ही तीस वर्षांची अविवाहित विदुषी (?) आहे ...' (पृ. ५०) 'श्री-कृष्णचरित्रनिर्मिती'च्या इतिहासाचा थोडा जरी शोध घेतला असता, तर अशा अस्थानी तुलनेत खर्ची पडलेले श्रम व पाने वाचली असती!

श्री. वा. ना. देशपांडे यांनी 'आद्य मराठी कवयित्री' या नावाच्या पुस्तकात महदाइसेची ही रचना प्रथम प्रकाशात आणली. त्यात धवळचाचे पूर्वार्ध, उत्तरार्ध व मातृकी रुक्मिणी-स्वयंवर या तीनही रचनांचा समावेश त्यांनी केला आहे. डॉ. सौ. इर्लेकर यांनी आपल्या संपादनात 'मातृकी रुक्मिणी स्वयंवर' वगळले आहे, ते योग्यच झाले; परंतु त्याची कारणमीमांसा त्यांनी दिलेली नाही किंवा आपल्या प्रस्तावनेत त्याचा उल्लेखही त्यांनी केलेला नाही. या रचनांच्या बाबतीत पूर्वार्ध व उत्तरार्ध या दोन्ही रचना महदाइसेच्याच असून 'मातृकी रुक्मिणी स्वयंवर' ही कृत्रिम रचना महेंद्र व लक्ष्मींद्रभट या पंडितद्वयाची आहे, ही गोष्ट मी 'महदाइसेचे धवळे' या शीर्षकाच्या माझ्या लेखात सिद्ध केलेली आहे. ('संशोधन साधना' पाहा.) तेव्हा तिचा विस्तार मी येथे अधिक करीत नाही. 'महदाइसे'चे 'महदंबा' हे संस्कृत नामकरण 'रत्नमालास्तोत्र' या संस्कृत काव्यात 'केसोबासा'ने केले. तथापि महानुभाव वाङ्मयात सर्वत्र तिचा उल्लेख 'महदाइसा' असाच असल्याने 'महदाइसेचे धवळे' हे ग्रंथनाम अधिक उचित ठरले असते. श्री. देशपांडे यांचे संपादन १९३५ मध्ये प्रसिद्ध झाले. त्यानंतर ४२ वर्षांनी प्रसिद्ध केलेल्या डॉ. सौ. इर्लेकर यांच्या या संपादनात काव्यातील अर्थस्पष्टीकरणात्मक टीपा व अन्य विवेचन आले असते, तर बरे झाले असते. शब्दकोशही श्री. देशपांडे यांचाच बव्हंशी वापरण्यात आलेला आहे व ज्या ठिकाणी वेगळा अर्थ दिला, त्यापेक्षा श्री. देशपांडे यांचाच अर्थ अधिक योग्य वाटतो. उदा.– १) अवस्वरी-चिंता, पू. २५/१, २) कडवसी–कडोसरी, उ. ४२/२, ३) धवळ–यशोगीत, पू. १/२, ४) फोकरिती–प्रसिद्ध करणे, पू. २५/३. इत्यादी. महंत कृष्णदास महानुभावांसारख्या आदरणीय विद्वानांनी मूळ संहिता व अर्थविवेचन 'दृष्टिपूत' करून विस्ताराने दिले असते, तर ते पंथीयांच्या तसेच अभ्यासकांच्याही 'उपेगा गेले असते.'

डॉ. सौ. सुहासिनी इर्लेकर ह्या स्वतः एक उत्तम कवयित्री असल्याने महदाइसेच्या धवळयांचा रसोद्ग्राही परिचय त्यांनी करून दिला आहे. त्यातील सौंदर्यस्थळे त्यांनी मार्मिकपणे टिपली आहेत व महदाइसेच्या कविहृदयाचा अंतरंग परिचय हळुवारपणे घडविला आहे. 'भागवत' ग्रंथातील रुक्मिणी-



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

हरण कथा महदाइसेच्या काव्यात स्थूलनिवेदनाचे स्वरूप न घेता काव्यात्म कशी बनते, तिला गतिमानता व चित्रमयता कशी प्राप्त होते हे सौ. इर्लेकर यांनी चांगल्या रीतीने स्पष्ट केले आहे. मात्र 'धवळे' ही एक जाणीवपूर्वक केलेली कलानिर्मिती मानण्यापेक्षा तीमधील उत्स्फूर्तता ध्यानी घेणे अधिक योग्य झाले असते असे वाटते. प्राचीन मराठी साहित्याची आधुनिक दृष्टिकोणातून केलेली आस्वादपूर्ण समीक्षा यादृष्टीने डॉ. सौ. सुहासिनी इर्लेकरांचे संपादन अभिनंदनीय आहे. डॉ. यू. म. पठाण यांचा या संपादनास पुरस्कार लाभला आहे. सौ. इर्लेकर यांनी पी एच्. डी. साठी 'सतराव्या शतकापर्यंतच्या मराठी कवयित्रींचे वाङ्मयीन कार्य' ह्या विषयावर प्रबंधलेखन केले आहे. 'प्रस्तुत ग्रंथाच्या प्रदीर्घ प्रस्तावनेत मी त्या अभ्यासाचा गाभाच वाचकांपुढे ठेवला आहे,' असे त्या म्हणतात. त्या दृष्टीने त्यांच्या प्रबंधाच्या वाचनाची उत्सुकता त्यांनी निर्माण केलेली आहे. डॉ. सौ. इर्लेकर यांचा महानुभावीय व अन्य प्राचीन साहित्याचा अभ्यास प्रबंधापुरताच मर्यादित न राहाता यापुढेही होत राहील व त्याचे वाङ्मयीन स्वरूप आपल्या रसिक दृष्टीने त्या उलगडून दाखवतील, अशी अपेक्षा आहे.

—वसंत स. जोशी

---

## 'संदर्भ भारती':

हिंदी द्वैमासिक; वर्ष ४, अंक १; फेब्रु. १९७८; तेलुगू साहित्य विशेषांक; संपादन-बाल शौरी रेड्डी; भारतीय भाषा परिषद प्रकाशन; ९ कैमक स्ट्रीट, कलकत्ता; प्रमुख संपादक – सन्हैयालाल ओझा; पृ. ४८ वार्षिक वर्गणी १२ रु; अंकाची किंमत २ रु.

संदर्भ भारतीचा फेब्रुवारी १९७८ चा 'तेलगु साहित्य अंक' प्रकाशित झाला आहे. हे द्वैमासिक भारतीय भाषा परिषद कलकत्ता यांचे आहे. या परिषदेच्या अनेक उद्देश्यांपैकी एक उद्देश्य अन्योन्य भारतीय भाषांतील साहित्यांचा सर्वांना परिचय करून देण्याचा आहे. या प्रेरणेनेच हिंदीचे साहित्यिक संपादक सन्हैयालाल ओझांनी आतापर्यंत गुजराती, बंगाली, हिंदी, कन्नड, मराठी व आसामी साहित्याचा परिचय करून दिला आहे. या अंकात तेलगू साहित्याचा परिचय आहे. संपूर्ण अंक ४८ पृष्ठांचा आहे. यावरून या अंकावर आलेल्या मर्यादांची जाणीव होईल. संपादकीयात ओझा म्हणतात– 'भारतात बोलल्या जाणाऱ्या भाषांचे क्रम लावताना हिंदी नंतर तेलगूचा क्रम लागतो. या भाषेला हिंदी इतकाच प्राचीन इतिहास आहे.' ही भाषा प्रचलित प्राकृतापासून आली आहे व तिची लिपी ब्राह्मीच्या दक्षिण शाखेचे रूप असल्याचे मतही त्यांनी व्यक्त केले आहे. शेवटी ते म्हणतात– 'आधुनिक साहित्याचे सम्यक् दर्शन घडविणे अवघड असल्याने आधुनिक कालखंडातील फक्त स्वातंत्र्योत्तर तेलगू साहित्याचाच परिचय येथे दिला आहे.'

या अंकाचे संपादन श्री. बालशौरी रेड्डी यांनी केले आहे. त्यांचा 'स्वातंत्र्योत्तर तेलुगु साहित्य' हा लेख स्वातंत्र्योत्तर काळात निर्माण झालेल्या साहित्यातील प्रवृत्तींचा परिचय करून देणारा आहे. निजामशाहीतून मुक्ती, तेलंगण आंदोलन, ६२ चे चीन आक्रमण या सारख्या राजकीय घटनांचा प्रभाव कविता, कादंबरी व नाटकावर पडल्याचे यातून जाणवते. सामाजिक जीवनावर नैसर्गिक आपत्तीच्या– भूकंप, दुष्काळ, वादळ झालेल्या परिणामाचे प्रतिसाद साहित्यात उमटलेले दिसतात. कवि श्रीश्रींचे आत्मकथन साहित्यातील प्रवाहावर प्रकाश टाकणारे व कवितेच्या अभिव्यक्तीतील परिवर्तनाचे स्वरूप दाखवणारे आहे. दयावंतींच्या 'संवेदना' मध्ये लेखक क्रियेपासून कसा दूर जात आहे हे मार्मिकपणे दाखविले आहे. निर्मल व बा. रेड्डी यांनी अनुवादित केलेल्या कवितेत "किशोर 'बुद्धिजीवी,' एन्वी–आँसू, दाशरथी–आलोचना–लोचन तसेच अनुदित कथा व लघुनाटिकेत लेखकांच्या सामाजिक जाणिवांचे स्वरूप स्पष्ट होते. या अंकात साहित्याचे सर्व प्रकार अनुवादरूपाने मांडले आहेत यातून स्वातंत्र्योत्तर तेलगू साहित्याचे स्वरूप व त्याच्या बैठकीची जाणीव स्पष्टपणे होते. या दृष्टीने या अंकात भाषा परिषदेने आपले उद्दिष्ट साध्य केले आहे, असे म्हणावयास हरकत नाही

— त्र्यं वा. कोटबागे




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

## सार-संकलन

### परदेश

पाकिस्तानचे भूतपूर्व प्रधानमंत्री श्री. झुल्फिकार अली भुट्टो ह्यांना लाहोर हायकोर्टाने १९ मार्च १९७८ रोजी फाशीची शिक्षा सुनावली. भुट्टो ह्यांच्यावरील आरोप असा होता की त्यांनी श्री. अहमद रेझा कस्तुरी ह्या एका राजकीय नेत्याला ठार मारण्याचा हुकूम नोव्हेंबर १९७४ मध्ये दिला होता, आणि त्याला अनुसरून, कस्तुरी यांच्या मोटार-गाडीवर बंदुकधारी इसमांनी एका जीपमधून छापा घातला; कस्तुरी जरी निसटले तरी त्यांच्या वडिलांना गोळीबारात प्राणांतिक जखमा झाल्या. भुट्टो यांच्याबरोबर पाकिस्तानच्या संघराज्य सुरक्षा-दलाच्या ( फेडरल सिक्युरिटी फोर्स ) चार अधि-काऱ्यांनाही फाशीची शिक्षा देण्यात आली. हे दल भुट्टो यांनीच अधिकारावर असताना अंतर्गत सुव्यवस्था राखण्यासाठी म्हणून स्थापन केले होते. सध्याच्या लष्करी राजवटीने त्याचे विसर्जन केले आहे. ह्या खटल्यात प्रमुख साक्ष मियां महम्मद आब्बास ह्या विसर्जित संघराज्य सुरक्षादलाच्या त्या वेळच्या प्रमुखाने दिली.

हायकोर्टाच्या पाच न्यायाधिशांच्या बेंचने हा निकाल दिला. निकालात भुट्टो आणि इतर आरोपी यांच्यावरील आरोप पूर्णपणे शाबीत झाले आहेत असे त्यांनी म्हटले आहे. खोटे बोलणे भुट्टोंच्या इतके अंगवळणी पडले आहे की केवळ सत्य असेल ते बोलणे त्यांना जमत नाही, तसेच भुट्टो ह्यांनी न्यायाधिशांचा अपमान केला, त्यांना धमक्या दिल्या असेही भुट्टो यांचे वर्णन निकालात करण्यात आले आहे. स्वत: भुट्टो यांनी ह्या खटल्याचे, 'राजकीय फायदा उठविण्यासाठी वापरण्यात आलेले एक साधन' असे वर्णन केले आहे. शिक्षेविरुद्ध सुप्रीम कोर्टाकडे अपील करण्यासाठी भुट्टोंना सात दिवसांची मुदत देण्यात आली होती व सुरवातीला जरी भुट्टोंचा अपील करण्याविरुद्ध कल होता–किंवा असा त्यांचा कल होता असे सांगण्यात येत होते–तरी त्यांनी अखेरीस अपील दाखल केले.

ह्या शिक्षेविरुद्ध पाकिस्तानमध्ये तीव्र प्रतिक्रिया होईल हे अपेक्षितच होते. भुत्तो यांच्या 'लोकपक्षा' च्या ( पीपल्स पार्टी ) किमान पाचशे कार्यकर्त्यांना प्रतिबंधक अटक करण्यात आली आणि भुत्तो यांची पत्नी आणि बेनझीर ही मुलगी ह्यांना त्यांच्या घरात स्थानबद्ध करण्यात आले. लाहोर येथे कित्येक हजार व्यक्तींनी भुत्तो ह्यांना देण्यात आलेल्या शिक्षेविरुद्ध निदर्शने केली आणि कराची येथे निदर्शने संघटित करू पाहणाऱ्या अनेक इसमांना अटक करण्यात आली. सिंध विद्यापीठ बेमुदत बंद करण्यात आले. निवृत्त जनरल टिक्काखान यांना अटक करण्यात आल्याची बातमी आहे.

पाकिस्तानमधील प्रतिक्रिया अपेक्षेपेक्षा कमी तीव्र आहे असे म्हणावे लागते. पाकिस्तानी सैन्यात जर संघटित असंतोष असला तर त्याची दृष्य चिन्हे आढळून येत नाहीत. पोलिस आणि सैन्यदल यांना भुत्तो यांच्या अनुयायांकडून होणारा संभाव्य उठाव सुरवातीलाच दडपून टाकण्यात यश आले आहे असे आजतरी दिसत आहे. ज. झिया-उल हक यांची सैन्यदलावर पुरेशी भक्कम पकड आहे असाच ह्याचा अर्थ लावला पाहिजे.

भुत्तो यांच्या शिक्षेला परदेशात झालेली प्रतिक्रिया अधिक कुतूहलपूर्ण आणि उद्‌बोधक आहे. लंडनमध्ये भुत्तो यांना दिलेल्या शिक्षेची बातमी ऐकून 'धक्का' बसला आणि 'आश्चर्य' वाटले असा वृत्तांत आहे. मजूरपक्षाचे भूतपूर्व परराष्ट्रमंत्री लॉर्ड गार्डन-वॉकर यांनी भुत्तो यांच्यावरील खटला त्यांच्या राजकीय विरोधकांनी भरला असल्यामुळे भुत्तो ह्यांना न्याय मिळाला असेल असे मानणे कठीण आहे असे मत व्यक्त केले आणि भुत्तो लोकप्रिय असल्यामुळे त्यांना शिक्षा दिली तर पाकिस्तानमध्ये यादवी माजेल ह्या कारणामुळे तरी त्यांची मुक्तता करावी असा सल्ला

अनुक्रमणिका


मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

दिला. श्री. जॉज न्लिक्स 'युनायटेड ख्रिश्चन इमिग्रंट्स ऑर्गनायझेशन' ह्या संघटनेचे चिटणीस, यांनी ह्या शिक्षेला प्रतिबंध करण्यासाठी तिच्या-विरुद्ध जागतिक निषेध प्रकट करण्यात यावा अशी सूचना केली. ब्रिटनचे परराष्ट्रमंत्री डॉ. ओवेन, पंतप्रधान श्री. कॅलाहन, तुर्कस्तानचे पंतप्रधान, यु. ए. इ. चे राष्ट्राध्यक्ष झैद, लिबियाचे क. गडाफी हे सर्व भूत्तो यांच्यासाठी रदबदली करू पाहत आहेत. सौदी अरेबिया, अमेरिका व चीन ह्या राष्ट्रांकडून पाकिस्तानला भरघोस आर्थिक मदत होते. ह्या राष्ट्रांपैकी कुणीही एकाने किंवा सर्वांनी एकत्र येऊन जर भुत्तोंचे प्राण वाचवावेत अशी गळ घातली तर झिया-उल-हक यांना ती नाकारणे जड जाईल. पण भुत्तो जिवंत राहून तुरुंगवासात अडकले तर सध्याच्या लष्करी राजवटीला, किंबहुना भुत्तो जिचे सर्वश्रेष्ठ सत्ताधीश नाहीत अशा कोणत्याही पाकिस्तानी राजवटीला त्यांचा कायमचा धोका राहील हा सध्याच्या पाकिस्तानी सत्ताधाऱ्यांपुढील पेच आहे.

कुणाही व्यक्तीचे प्राण मोलाचे असतात आणि ते वाचविण्यासाठी सर्वतोपरी प्रयत्न करणे योग्य असते हे सुसंस्कृत जीवनाचे मूलभूत तत्त्व आहे. ह्या तत्त्वाप्रमाणे भुत्तो यांचे प्राण वाचविण्यासाठी आंतरराष्ट्रीय पातळीवरून होणारे निकराचे प्रयत्न स्वागतार्ह आहेत. पण ह्या तत्त्वाला मर्यादा अशी की कुणाही व्यक्तीचे प्राण इतर कुणाही व्यक्तीच्या प्राणापेक्षा कमी मोलाचे नसतात. बांगला देशचे शेख मुजीब-उर् रेहमान ह्यांचा आणि त्यांच्या कुटुंबियांचा जेव्हा निर्घृणपणे वध करण्यात आला तेव्हा श्री. भुत्तो ह्यांना दिलेल्या शिक्षेच्या बातमीने ज्यांना 'धक्का' बसला ती मंडळी फारशी अस्वस्थ झालेली दिसली नाही. शेख मुजीब यांचा मारेकरी सुरक्षितपणे एका राष्ट्रातून दुसऱ्या राष्ट्रात उड्डाण करीत होता आणि अखेरीस त्याला संरक्षण मिळाले. तेव्हा व्यक्तीचे प्राण मोलाचे असतात ह्या तत्त्वाचा वरील राष्ट्रे व्यक्ती निवडून वापर करतात असे म्हणावे लागते. जर भुत्तो ह्यांचे प्राण वाचविण्याची खटपट केवळ मानवतावादी वृत्तीतून होत नसेल तर ती कोणत्या कारणासाठी म्हणून करण्यात येत आहे. भुत्तो यांच्या अमाप लोकप्रियतेमुळे त्यांना फाशी देण्यात आली तर पाकिस्तानात यादवी माजेल अशी निश्चिती आहे आणि म्हणून ही शिक्षा सौम्य करावी असे कारण पुढे करण्यात येत आहे. पण आशिया आणि आफ्रिका खंडातील राष्ट्रांत अंतर्गत अशांतता असणे, यादवी युद्धे होणे, राजवटी एकाएकी बदलणे ह्या गोष्टी पश्चिमी राष्ट्रांना अपरिचित नाहीत; आणि ह्या स्वरूपाच्या घडामोडी एका विशिष्ट दिशेने घडून याव्यात यासाठी ती हातभार लावीत नाहीत असेही नाही. तेव्हा केवळ पाकिस्तानात यादवी घडून येण्याचा धोका आहे एवढ्याच कारणाने ती फारशी व्यथित होतील अशी शक्यता नाही; तेव्हा 'भुत्तो ह्यांच्यावर भरण्यांत आलेल्या खटल्यात त्यांना न्याय मिळाला नाही' हे निश्चित असल्यामुळे त्यांना झालेली शिक्षा हे केवळ त्यांच्या राजकीय विरोधकांनी त्यांना नष्ट करण्यासाठी केलेले एक कृत्य ठरते, माणसाला कोणत्याही उद्दिष्टासाठी ठार मारणे हा मानवी संस्कृतीवरील कालिमा ठरतो आणि म्हणून भुत्तो यांना दिलेली शिक्षा अंमलात आणू नये अशी याचना काय ती उरते.

कायद्याला सोडून कुणाही व्यक्तीचा वध करू नये, किंबहुना कायद्यातसुद्धा देहान्ताची शिक्षा देण्याची तजवीज असणे रानटीपणाचे आहे हे म्हणणे योग्य आहे. आणि हे तत्त्व सर्वांना, श्री. भुत्तो यानासुद्धा लावले पाहिजे, असा आग्रह धरणेही योग्य आहे. म्हणजे भुत्तो ह्यांनी स्वतः जरी कायद्याची बंधने कधी पाळली नाहीत, स्वतःची सत्ता निरंकुश असावी यासाठी वाटतील ते अमानुष उपाय वापरायला मागेपुढे पाहिले नाही तरी कायद्याचे हे मूलभूत तत्त्व त्यांनाही लावले पाहिजे. श्री. भुत्तो यांच्यावरील आरोप खरे असतील तर आपल्या प्रतिस्पर्ध्याचा काटा काढण्यासाठी त्यांनी त्याला ठार मारण्याचा प्रयत्न केला, ह्या प्रयत्नांत कायदा आणि सुव्यवस्था राखण्यासाठी म्हणून निर्माण करण्यात आलेली सरकारी सुरक्षादलाची यंत्रणा वापरली आणि ह्या सर्व खटाटोपात एका निरपराध व्यक्तीचा जीव गेला. हे आरोप सिद्ध झालेले नाहीत, भुत्तो निर्दोषी असणे शक्य आहे असे जे अनेकांना वाटत आहे असे ते म्हणतात त्याला आधार काय? भुत्तो यांच्यावरील खटला लाहोर हायकोर्टाच्या न्यायाधिशां-पुढे चालला. त्यांनी दिलेला निर्णय हा न्यायाच्या तत्त्वांना अनुसरून नाही असे मानायला पुरावा काय?



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

ह्या बाबतीत संशय घ्यायला एकच कारण आहे आणि ते हे की खटल्याच्या सुनावणीचा काही भाग गुप्तपणे चालविण्यात आला. पण ही सुनावणी गुप्तपणे व्हावी असा जर न्यायाधिशांनीच निर्णय दिला असेल तर त्याला काही पुरेशी कारणे असतील.

ह्या एकंदर प्रकरणावरून बऱ्याच प्रकारचे बोध घेता येतील. एकतर ब्रिटन, अमेरिका, मध्यपूर्वेतील मुसलमान राष्ट्रे व चीन यांना आपापल्या उद्दिष्टांसाठी सध्याच्या लष्करी राजवटीपेक्षा भुत्तो यांची राजवट पाकिस्तानात असणे अधिक पसंत आहे. सध्याची लष्करी राजवट अस्थिर आहे, पुढेमागे आपल्या लोकप्रियतेच्या जोरावर, राजकीय कौशल्याचा वापर करून भुत्तो परत सत्ताधीश होतील असा त्यांचा अंदाज आहे आणि असे होणे त्यांच्या फायद्याचे आहे. श्री. भुत्तो ह्यांनी बेबंदपणे सत्ता वापरली, निर्घृण उपाय योजून अंतर्गत 'बंडाळी' शमविली, निवडणुकांत सर्व शक्य खोटेनाटे प्रकार केले ह्याचे त्यांना सोयरसुतक नाही. सुसंस्कृत पश्चिमी राष्ट्रे सोडली तर इतरत्र 'न्याय' ही संकल्पना नाही, न्यायाधीशसुद्धा सत्ताधीशांच्या आदेशाप्रमाणे निर्णय देतात अशी त्यांची खात्री आहे. स्वतःच्या न्यायसंस्थेविषयी ह्या स्वरूपाचा संशय कुणी व्यक्त केला तर ते त्यांना अपमानास्पद वाटेल. राजकीय सत्ताधीश हा (सुसंस्कृत पश्चिमी राष्ट्रे सोडली तर) कायद्यापलीकडे असतो, त्याचे अधिकार त्याला कायद्याला अनुसरून मिळालेले नसतात, ते त्याला साक्षात् लोकांपासून लाभलेले असतात, 'लोकां'च्या कल्याणासाठी हे अधिकार वापरताना प्रस्थापित कायद्यांची अडचण निर्माण झाली तर ती त्याने न जुमानणे योग्य असते, हे तत्त्व सर्व सत्ताधीशांना मान्य होण्यासारखे असते. ह्यामुळे असे वागल्याने एखादा राजकीय, सत्ताधीश अडचणीत आला तर त्याच्या मदतीसाठी इतर धावून येतात. फक्त हा सत्ताधीश त्यांच्या गटातला असला पाहिजे.

'जनते'च्या पाठिंब्यावर श्री. भुत्तो सत्ताधीश झाले, 'जनता' उलटली तेव्हा ते सत्ताभ्रष्ट झाले; त्याच 'जनते'च्या प्रेमामुळे त्यांचे प्राण कदाचित् वाचतील आणि ते परत सत्ताधारी होतीलही. हा सर्व 'लोकशाही'चा खेळ चालला असताना मूलभूत मानवी मूल्यांचे संरक्षण करणे, कायद्याच्या राज्याची संकल्पना पाकिस्तानात टिकवून धरणे ही तेथील मूलभूत सुशिक्षित वर्गाची जबाबदारी ठरते. ही जबाबदारी ते पार पाडतील ही आशा बाळगावी असे त्यांचे आतापर्यंतचे वर्तन नाही.

प्रसिद्ध झाले : नवे प्राज्ञ प्रकाशन :

आनंदाचा डोह

– तुकारामाच्या अभंगवाणीचे रसिकावलोकन करणारा मराठीतील अनन्यसाधारण ग्रंथ

लेखक : प्रा. रा. ग. जाधव

मूल्य : रु. ८–००

मागणी : कार्यवाह, प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई – ४१२८०३ (जि० सातारा)





राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# प्राज्ञपाठशाळामंडळ ग्रंथमाला

## मराठी

| | | | |
|---|---|---|---|
| (१) | वैदिक संस्कृतीचा विकास : तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी | ... | ३०·०० |
| (२) | अद्वैतसिद्धीचे मराठी भाषांतर (पूर्वार्ध) : ब्र. स्वामी केवलानंदसरस्वती | ... ... | ७५·०० |
| (३) | इतिहासाचे तत्त्वज्ञान : प्रा. सदाशिव आठवले | ... ... | १०·०० |
| (४) | क्रोचेचे सौंदर्यशास्त्र : एक भाष्य : डॉ. रा. भा. पाटणकर | .... ... | १०·०० |
| (५) | सिंधु संस्कृती, ऋग्वेद व हिंदु संस्कृती : प्र. रा. देशमुख | ... | १०·०० |
| (६) | पुरोहितवर्गवर्चस्व व भारताचा सामाजिक इतिहास : डॉ. सुमंत मुरंजन | ... ... | ८·०० |
| (७) | चार्वाकः इतिहास आणि तत्त्वज्ञान : प्रा. सदाशिव आठवले | ... | ६·०० |
| (८) | मानवाचा आदर्श } ले. मानवेंद्रनाथ रॉय | ... ... | ६·०० |
| (९) | नवमानवतावाद } अनु. गोवर्धन पारीख | ... ... | ५·०० |
| (१०) | गीता-प्रवेश : डॉ. गो. वि. देवस्थळी | ... ... | ५·०० |
| (११) | लोकशाहीचे धोके : पन्नालाल सुराणा | ... ... | ४·०० |
| (१२) | भारतीय स्त्रीधर्माचा आदर्श : सौ. कमल पाध्ये | ... ... | ४·०० |
| (१३) | हिंदी साहित्यविचार : प्रा. प्यारेलाल गोहेल | .... ... | ३·०० |
| (१४) | महाराष्ट्रातील दुष्काळ व त्यावरील उपाययोजना : चा. अ. दाभोलकर | ... ... | २·०० |
| (१५) | श्री. यशवंतराव चव्हाण— अभिनंदनग्रंथ | ... ... | २०·०० |
| (१६) | संशोधन साधना : डॉ. वसंत स. जोशी | ... ... | १२·०० |
| (१७) | ज्ञानदेव चिंतन (संपादित) : डॉ. वसंत स. जोशी | ... ... | २०·०० |
| (१८) | आनंदाचा डोह : प्रा. रा. ग. जाधव | ... ... | ८·०० |
| (१९) | भावार्थ रामायण (श्री एकनाथ महाराज कृत) बालकांड : | ... | १२·०० |
| (२०) | तरंगयामिक व पुंजयामिक : मा. ग. टोळे | ... ... | ५·०० |

प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई ( जि. सातारा )

ग्रंथ विक्रेत्यांना २० टक्के कमिशन.

हे मासिक पां. गो. आपटे यांनी दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी वाई येथे छापून मे. पुं. रेगे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ वाई यांचे करिता तेथेच प्रसिद्ध केले.





राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# प्रगतीचा अबलख वारू

शिक्षण, शेती, उद्योगधंदे, अर्थव्यवस्था...
ह्यांची चौफेर प्रगती झाल्याशिवाय जीवन
संपन्न होऊ शकत नाही...म्हणूनच,
त्या दिशेने आमचे सतत प्रयत्न चालू
आहेत...अगदी सुरुवातीपासून.

आपल्या देशात मोठ्या प्रमाणावर
दर्जेदार इंजिनांची निर्मिती करण्याचा
पहिला मान किर्लोस्करांचाच. शेती व
उद्योगधंदे यांना मदत, वाढता रोजगार,
अधिक प्रमाणावर परकीय हुंडणावळ
मिळविण्यासाठी वाढती निर्यात...
आमच्या विविध प्रयत्नांचा हेतु एकच
आहे...प्रगती...अखंड प्रगती.

देश विकासाच्या प्रयत्नात
आम्ही आपला वाटा नित्यनेमाने उचलीत
आहोत...जाणीवपूर्वक.







किर्लोस्कर ऑईल इंजिन्स लिमिटेड
खडकी, पुणे ४११ ००३.

® REGISTERED USER— KIRLOSKAR OIL ENGINES LTD., PUNE 411003


अनुक्रमणिका





राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई